देशीयतेचे तत्त्व असे सांगते की, आपण निर्माण केलेली प्रमाणके सोडून इतरांच्या प्रमाणकांचा स्वीकार करता कामा नये. कितीही मोठ्या प्रमाणावर वाहेरून उसनवारी केली तरी त्यामुळे देशीपणाला वळकटीच येईल. परंतु ज्या प्रमाणकांवर ह्या उसनवारीचा सांस्कृतिक व्यवहार चालेल, ती प्रमाणके आपली स्वत:ची असली पाहिजेत. जर विशिष्ट प्रकारची आंतराष्ट्रीयता आपल्याला परवडत नसेल, तर ती झुगारली पाहिजे. देशीयतेचे महत्त्व स्वीकारले की, पहिली जवाबदारी म्हणजे जगभरच्या वावड्या न उडवता प्रथम आपल्या घराजवळची वस्ती, आपला गाव, प्रदेश, भाषा, प्रांत ह्यावर आधी लक्ष केंद्रित करावे. स्वातंत्र्योत्तरकाळात आपल्या देशात असे भोंदू विचार, राजकीय पक्ष आणि पंथ महत्त्वाचे ठरले की, जे राष्ट्रीय एकात्मता, भारत जोडो, आंतरभारती, अखिल जग आणि विश्वमानव ह्यांच्या कल्याणाच्या गोष्टीच फक्त करतात. खोट्या सुखद एकतेचा आणि भव्य विशालतेचा प्रयोग राजकीय युक्ती म्हणून प्रवळ सत्ताधारीवर्ग जनतेवर नेहमीच करत असतो.

जगातल्या सर्वात प्राचीन जिवंत मानवी संस्कृतीचे सभासद म्हणून तरी देशीयता हे मानवी अस्तित्वासाठी एक आवश्यक आणि मौलिक तत्त्व म्हणून ह्या पृथ्वीवर प्रस्थापित करायला हिंदुस्थानी लोक सर्वाधिक पात्र आहेत असे मला वाटते.

(साहित्य अकादमी, आणि शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, यांच्या वतीने "मराठी साहित्यातील प्रादेशिकता" या विषयावर दि. २८ व २९ डिसेंबर १९८७ रोजी आयोजित केलेल्या चर्चासत्रात वाचला गेलेला निबंध.) ⌘

## साभार स्वीकार

### कविता

**मराठी प्रेमकविता :** शान्ता शेळके व अरुणा ढेरे–संपा; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८७ रु. ५० ★ **भर्तृहरीकृत शतकत्रयी :** ल. गो. विंझे; शुभदा सारस्वत पब्लि. पुणे ५; १९८६ रु. ६० ★ **गोदातटी :** माधव कमोद–अनु; प्र. शं. कमोद, नासिक; १९८७ रु. १० ★ **अभंग कर्मवीरांचे :** प्रकाश जडे; सौ. इन्दू जडे, मंगळवेढा; १९८७ रु. ५ ★ **परिच्छेद :** निरंजन उजगरे; अनुपमा उजगरे, मुलुंड; १९८७ रु. २० ★ **मनमाधवी :** मा. गो. काटकर; रविराज प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. १५ ★ **हिरवी गाणी :** अंजली कीर्तने; श्री विद्या प्रकाशन; पुणे ३०; १९८७ रु. २७–५० ★ **मास्कोतील कविता :** वापूराव जगताप; श्री विद्या प्रकाशन; पुणे ३०; १९८८ रु. २७–५० ★ **प्रार्थना :** फ. मु. शिंदे; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. २७–५० ★ **स्त्री सूक्त :** अश्विनी धोंगडे; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८८ रु. २७–५०.

### कादंबरी

**पालापाचोळा :** दीपाकांत राक्षे; दीपा प्रकाशन, पुणे २८; १९८७ रु. २५ ★ **मैत्रेयी :** अरुणा ढेरे; सुरेश एजन्सी पुणे २; १९८७ रु. २५ ★ **तुंबाडचे खोत** (खंड एक व दोन) : श्री. ना. पेंडसे; कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ९५ + १२५ ★ **अलकनंदा :** सुरेश द्वादशीवार; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ३५ ★ **अराजक :** वा. ह. कल्याणकर; देशमुख आणि कं. पुणे ३०; रु. ७५ ★ **मेड इन इंडिया :** पुरुषोत्तम वोरकर; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ४५ ★ **खंजिरीचेबोल :** उद्धव ज. शेळके; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८७ रु. ६० ★ **तुका म्हणे ऐसा नरा :** रतनलाल डी. शहा; नीहारा प्रकाशन, पुणे २; १९८८ रु. १८ ★ **उजेडाची ओढ;** स्नेहसुधा कुलकर्णी; नीहारा प्रकाशन, पुणे २; १९८८ रु. २०.

### कथा

**नागमंडळ :** अरुणा ढेरे–संपा; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८७ रु. ५० ★ **काही कथा काही व्यथा :** ना. वा. फडके; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ५०.

# मराठी संतांचे तत्त्वज्ञान

## (उत्तरार्ध)

ह. श्री. शेणोलीकर

(या लेखाचा पूर्वार्ध 'म. सा. पत्रिके'च्या जुलै–सप्टेंम्बर १९८७ च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे.)

**कर्मयोगातील तारतम्य :**

संतांनी दाखविलेली कर्मयोगातील तारतम्यबुद्धी आणि भक्तियोगाची सामाजिकता या गोष्टींना धार्मिक आणि नैतिक शिकवणुकीच्या संदर्भात विशेष महत्त्व प्राप्त होते. वैदिक कर्मठ आणि कर्मभ्रष्ट अवैदिक ही दोन टोके लक्षात घेऊन नव्या कर्मयोगाचा मध्यम मार्ग संतांनी घालून दिला आहे. देहधाऱ्याला अशक्य असलेला कर्मसंन्यासाचा मार्ग संतांनी त्याज्यच ठरविला आहे. संन्यासाश्रमातही काही कर्मे आवश्यक असल्याचे संत सांगतात. बाह्य संन्यासापेक्षा अंतरंग संन्यास त्यांना महत्त्वाचा वाटतो. देहमुंडणापेक्षा मनोमुंडण, म्हणजेच वासना, कल्पना, संकल्प–विकल्प इत्यादींचा संन्यास करणे हिताचे आहे, असे संत सांगतात. कर्मत्यागाची अस्वाभाविकता लक्षात घेऊन संतांनी त्याऐवजी कर्मफलत्यागाची 'युगुती' सुचविली आहे. गीतेने सांगितलेली नैष्कर्म्यसिद्धी स्वधर्मकर्माच्या आचरणानेच प्राप्त होते. म्हणून 'कर्मे करावी हा चांगु। निरोपु माझा॥' असे श्रीकृष्णाचे मनोगत ज्ञानेश्वर सांगतात. सत्कर्मे, स्वधर्म कर्मे ही चित्तशुद्धी करतात, म्हणून ती तीर्थांच्या योग्यतेची आहेत. सारीच कर्मे काही बंधनकारक होत नाहीत. कर्मापाठीमागील सकामता आणि सहेतुकता ही घातक आहे, ती सोडून देऊन स्वधर्माप्रमाणे कर्मे केल्यास 'बंधकेचि सोडवावया। मुख्ये होती॥' (ज्ञाने. १८.१६४). एकीकडे कर्मसंन्यासवाद्यांना वाटणारी कर्मबंधाची भीती दूर करण्यासाठी कर्मफलत्यागपूर्वक कर्मे करण्याची 'हातवटी' ज्ञानेश्वरादि संत दाखवून देतात, तर दुसरीकडे कर्मकांडाच्या नादी लागून कर्मबंध निर्माण करणाऱ्या कर्मठांना निष्कामवृत्तीने व निरहंकारपणे कर्मे करण्याची युक्ती ते दाखवितात. त्यासाठी कर्माचा पसारा हा त्रिगुणांचा धर्म आहे. आत्म्याशी त्याचा काही संबंध नाही. 'मुक्तीसाठी मी कर्मे करतो' ही भाषा फोल आहे. आत्म्याचे अकर्तेपण व गुणातीतता लक्षात घेऊन स्वधर्माचरण करीत गेल्यास त्या कर्माचरणातच 'ऐसी मुक्ती असे सहजच' असे आत्मज्ञानाचे माहात्म्य कर्मठांसाठी संत सांगतात. आत्मज्ञानी माणसाची कर्मे एखाद्या बालकाच्या कर्माप्रमाणे अहेतुकपणे चाललेली असतात. तीच कर्मे कर्त्याला मुक्तावस्थेचा अनुभव देत राहातात आणि इतरांना स्वधर्माचरणाचा कित्ता घालून देतात. स्वधर्म-कर्मे करताकरताच नैष्कर्म्यावस्थेप्रत जाता येते आणि धर्मरक्षणही करता येते, असे संतांचे सांगणे आहे.

**संतांचा नीतिविचार ( Ethics ) :**

संतांच्या कर्मयोग विचारामध्ये 'स्वधर्म' शब्द महत्त्वाचा आहे. सर्वच संतांनी स्वधर्म शब्दाचा अर्थ वर्णाश्रमधर्मापुरता मर्यादित केला आहे. ही त्या सिद्धांताची मर्यादा न समजता संतकालीन समाजस्थितीची मर्यादा मानली पाहिजे. केवळ रामदासांनाच नव्हे तर ज्ञानेश्वर-तुकारामादि संतांनाही ऐतिहासिक गरजेमुळे वर्णाश्रमधर्माच्या पुनरुज्जीवनाची भूमिका घ्यावी लागली असे दिसते. मानवधर्म व वर्णधर्म यातील अंतर्विरोध पत्करून मुळात गीतेनेच ती मर्यादा मानली आहे. मुस्लिम राजवटीने वैदिक धर्मावर आणलेली गंडांतरे लक्षात घेऊन एकनाथी भागवताने तर 'गोब्राह्मण-स्त्रिया यांचे रक्षण म्हणजेच स्वधर्माचे रक्षण' अशी भूमिका आवर्जून स्वीकारलेली दिसते. दत्तसंप्रदाय व गुरुचरित्र यांनी तर त्या काळात या मर्यादित अर्थावरच भर दिला होता. यातूनच 'गोब्राह्मण–प्रतिपालक' ही

बिरुदावली शिवाजीराजांच्या नावामागे गौरवचिन्ह म्हणून चिकटली असे दिसते. वास्तविक संतांची धर्मदृष्टी तत्त्वत: देशकालातीत अशीच असली पाहिजे. भागवतधर्माची नैतिक शिकवण सार्वत्रिक व सार्वकालिक अशीच आहे. परंतु त्या त्या स्थलकालाचेही काही ऋण असते. ते त्या मर्यादांच्या चौकटीत राहूनच फेडावे लागते. 'स्वधर्म' या संज्ञेच्या बाबतीत वर्णाश्रमधर्माची चौकट स्वीकारूनच ज्ञानेश्वरादि संतमंडळींनी ते कालऋण फेडले आहे, असे मला वाटते. 'शूद्राघरची पक्वान्ने चांगली असली तरी दुबळ्या (भुकेल्या) ब्राह्मणाने ती कशी ग्रहण करावीत ?' असा दाखला ज्ञानेश्वरांसारखा संत जेव्हा देतो, तेव्हा त्यांच्यावर संकुचितपणाचा दोष लादावा असे आज एखाद्याला वाटेलही. पण 'अविधी आचरण परम दूषण । वेदो नारायण बोलियेला ।' ही मर्यादा त्यांनी जाणीवपूर्वक स्वीकारल्याचे नामदेव सांगतात, हे आपण विसरता कामा नये.

विज्ञान एवढे प्रगत झाले असताना आजही आपणाला सामाजिकदृष्ट्या काही मर्यादा पाळणे भाग पडत आहे. अपेक्षित असलेली 'समता' पूर्णांशाने आपणही आचरू शकत नाही, ही वस्तुस्थिती कोण नाकारील ? संत काही सामाजिक समतेची क्रांती घडवून आणायला बद्धपरिकर झालेले नव्हते. सामाजिक आचरणाचे बंध तोडून समाजात सबगोलंकारी समता आणायची त्यांची तयारी नव्हती. आजच्या परिभाषेत बोलायचे तर, ते समाजक्रांतिकारक नव्हते, धर्मसुधारक होते. भक्तीच्या क्षेत्रात–पंढरीच्या वाळवंटात बंधुता व समता आणण्याकरिता 'एथ भक्ति हे सरती ( श्रेष्ठ ) । जाति अप्रमाण ॥' या ध्येयवाक्याचा उद्‌घोष त्यांनी चालविला होता, हा इतिहास नाकारता येणार नाही.

मराठी संतांच्या धर्मविचाराला वैयक्तिक व सामुहिक अशी दोन्ही अंगे आहेत. 'समाज धारणा करतो तो धर्म' यादृष्टीने समाजासाठी मराठी संतांनी काही केले नाही असा आक्षेप घेतला जातो तो योग्य नाही. सामाजिक अभ्युदयासाठी त्याकाळी वर्णाश्रमधर्मांचा पाठपुरावा त्यांनी केला, ही कालोचित अशीच गोष्ट होती. शिवाय विषमताप्रधान वैदिक धर्माला त्यांनी उदारमतवादी भागवतधर्माचे रूप दिले, हेच त्यांचे मोठे कार्य ठरते. त्या काळातील समाज कुलधर्म, जातिधर्म, ग्रामधर्म यातच वुडून गेला होता. त्या समाजाला पारंपरिक वर्णधर्माच्या चौकटीत आणून भागवतधर्माच्या माध्यमातून सार्ववर्णिक अशा मानवधर्माकडे वळविण्याचे महत्तम कार्य या संतमंडळींनी केले. 'संतांचा भागवतधर्म नसता तर परधर्मी रेट्याखाली सर्व समाज अविद्ध झाला असता' असे इतिहासाचार्य राजवाड्यांनी देखील कबूल केले आहे.

व्यक्तिगत जीवनातही सदाचरणाचा त्यांनी आग्रह धरलेला दिसतो. स्वार्थ प्रवृत्तीला आळा घालून पशुतुल्य जीवनातून मानवी पातळीवर व पुढे दैवी पातळीवर व्यक्तीला जाता यावे, यासाठीच वासनारहित कर्ममार्गाचा व शुद्ध आत्मज्ञानाचा त्यांनी पुरस्कार केला. व्यक्तीने कौटुंबिक कर्तव्य म्हणून अर्थ व काम हे पुरुषार्थ साधलेच पाहिजेत; पण त्यांना धर्माची मर्यादा हवी. यासाठी एकनाथांसारख्या संतांनी स्वतःच्या चारित्र्याने व एकनाथी भागवतातील शिकवणुकीने गृहस्थाश्रमाचा आदर्श लोकांपुढे ठेवला. मराठी संत हे आत्यंतिक निवृत्तिवादी किंवा निष्प्रपंचवादी नव्हते. 'आधी प्रपंच करावा नेटका ।' (रामदास) असेच ते म्हणत. 'जोडोनिया धन उत्तम वेव्हारे । उदास विचारे वेच करी ।' (तुकाराम) अशीच त्यांची शिकवण होती. घरदार सोडून, रानावनात जाऊन, जपतपादि साधने करीत बसण्याचे कारण नाही. स्वधर्माचे आचरण मात्र निष्ठेने केले पाहिजे. ज्याने त्याने आपापली कर्मे स्वधर्मभावनेने पार पाडली तर, व्यक्तीबरोबर समाजाचेही कल्याण साधते. म्हणून स्वधर्माचरणाच्या बाबतीत कोणीही अपवाद ठरू नये. प्राप्तपुरुष, ज्ञातेनेतें किंवा संतमहंत या सर्वांनीही स्वधर्माप्रमाणे आचरण केलेच पाहिजे. लोकसंग्रहासाठी, लोकसंस्थांच्या रक्षणासाठी किंवा अज्ञ लोकांना धडा घालून देण्यासाठी सर्व क्षेत्रातील धुरिणांनी 'मार्गाधारे वर्तावे । विश्व हे मोहरे लावावे ।' आणि 'जनीं दाखवावे वर्तोनिया ।' (नामदेव) अशी सर्वकाळी सर्वांना लागू पडणारी संतांची धार्मिक शिकवण आहे.

संतांची धर्मदृष्टी मुख्यतः नैतिक स्वरूपाची आहे त्यामुळे मराठी संतांच्या ग्रंथातून दुर्गुण–त्याग आणि सद्‌गुणांचे संवर्धन यांवर विशेष भर दिलेला दिसून येतो. अवतारी पुरुष धर्म आणि नीती यांची गाठ घालतो. 'धर्मासी नीतीशी । शेंस भरी ॥' (ज्ञाने. ४.५३) असे ज्ञानेश्वरांनी आवर्जून म्हटले आहे. दैवी संपत्ती, ज्ञानलक्षणे, संतलक्षणे, सत्त्वगुण इत्यादींच्या विवरणामध्ये

ज्ञानेश्वर–एकनाथांनी अनेक सद्‌गुणांचे वर्णन केले आहे. उलट आसुरी संपत्ती, अज्ञानलक्षणे, रजोगुण, तमोगुण यांच्या विवेचनाचे वेळी त्याज्य अशा दुर्गुणांचे चित्रण त्यांनी केले आहे. हे सद्‌गुण व दुर्गुण व्यक्तीप्रमाणे समाजालाही लागू पडणारे आहेत. व्यक्तिहित आणि समाजकल्याण या दोन्ही दृष्टींनी संतांनी या गुणावगुणांचा परामर्ष घेतला आहे, त्यावरूनही संतवाङ्‌मयाच्या सामाजिकतेचा प्रत्यय येतो.

मनुष्यस्वभाव त्रिगुणात्मक आहे. त्यामुळे त्याची वृत्ती आणि कृती यांमध्ये त्रिविधताच प्रकट होणार हे जाणून गीतेने व भागवताने मानवी व्यवहाराचे व वृत्तींचे त्रैविध्य वर्णन केले आहे. त्याचा आधार घेऊन मराठी संतांनीही प्रत्येक गोष्टीचे त्रिविध स्वरूप आपल्यापुढे ठेवले आहे. त्यापैकी सात्विकतेला ग्राह्य ठरवून राजस व तामस प्रकारांना वर्ज्य मानले आहे. मात्र 'त्रिगुणातीत' होण्याची अशी एक आदर्श अवस्था कल्पून प्रत्येक बाबतीत चौथ्या निर्गुण प्रकाराचे (उदा : निर्गुण कर्म, निर्गुण कर्ता, निर्गुण ज्ञान, निर्गुण श्रद्धा इत्यादी) वर्णन भागवतामध्ये आढळते. ही आदर्श अवस्था आध्यात्मिक पातळीवरून लक्षात घ्यावी लागते. संतांनी प्राप्त पुरुष, सिद्ध, संत, ज्ञानी भक्त यांचे जे आदर्श वर्णिले आहेत, त्यांच्याच ठिकाणी त्रिगुणातीत अशी निर्गुणस्थिती संभवते. सामान्यांच्या दृष्टीने प्रत्येक गुणविशेषाची सत्त्वावस्था हीच आदर्श म्हणावी लागेल. अधिक सोपे करून सांगायचे झाले तर संतमंडळींनी सर्वच बाबतीत नेमस्तपणाचा, मध्यम मार्गाचा पुरस्कार केलेला दिसून येतो. उदा. कामविकाराची राजस–तामस रूपे म्हणजे अनेक स्त्रियांबद्दलचा हव्यास व परस्त्रीबद्दलची अभिलाषा त्याज्य होय. परंतु वेदांनी स्वस्त्रीबद्दलची कामासक्ती सात्विक ठरविली आहे, असे उदाहरण एकनाथ देतात. त्यातही स्थळकाळाची पथ्ये सांगून त्या विकाराचे सौम्य व नेमस्त स्वरूप ग्राह्य असल्याचे ते सांगतात. उलट त्याच विकाराचे अतिरेकी स्वरूप वर्णन करताना कुत्राकुत्री, गाढव–गाढवी, बोकड नि शेळी अशी ग्राम्य उदाहरणे देऊन कामविकाराची घृणा उत्पन्न व्हावी असा परिणाम एकनाथ साधतात. ज्ञानेश्वरीतली असली उदाहरणे पुढे ठेवूनच एकनाथांनी विषयी लोकांचा स्त्रीलंपटपणा त्याज्य कसा असतो हे दाखविले आहे.

संतांच्या नीतिबोधामध्ये षड्रिपु किंवा षड्‌वैरी म्हटल्या जाणाऱ्या सहा विकारांच्या अतिरेकी आविष्कारालां त्याज्य ठरविण्यात आले आहे. त्यातही काम-क्रोध-लोभ हे तीन विकार सर्व अनर्थांचे मूळ आहेत असे म्हटले आहे. ज्ञानीयांचीही मती भ्रष्ट करणारे 'कामक्रोधाचे द्वाडपण' (ज्ञाने. ३. २३२–२५९) अत्यंत प्रभावीपणे ज्ञानेश्वरांनी वर्णन केले आहे. एकनाथांनी स्त्रीलंपटता, स्त्रीसंग, स्त्रैणसंग आणि धनलोभ यांना सर्व दुःखाचे मूळ ठरविले आहे. अभिमान, अविश्वास आणि आशा–आसक्ती यांना सर्व पातकांचे आगर म्हटले आहे. या सर्व दुर्गुणांची गंगोत्री देहात्मभाव होय. 'देह म्हणजेच मी' असे मानून आपण वागू लागलो की, इंद्रियांच्या आधीन आपण होतो. इंद्रिये ही स्वभावतः बहिर्मुख आहेत. पंचविध विषयांबद्दलच्या अनिवार आसक्तीमुळे इंद्रिये आणि मन जीवाला नश्वर अशा जड–चेतन विश्वाशी जखडून टाकतात. वस्तुजातामध्ये गुरफटलेले मन प्रेयस्‌लाच श्रेयस् मानू लागते. विषप्राय असलेल्या विषयांची गोडी धरून जीव कर्माला प्रवृत्त होतो. कर्माकर्माच्या जंजाळात सापडून तो पापपुण्याचा धनी होऊन बसतो आणि जन्ममरणाच्या वाऱ्या करू लागतो. ज्ञानेश्वरादि संतांनी नैतिक दृष्टीने केलेली कर्ममीमांसा ही अशी आहे. ज्ञानेश्वर–एकनाथ लिहितात : 'गोड परमार्थ तो जाला कडू । ' आणि 'कडू विषय तो गोड । जीवासी जाहला ।।' (ज्ञाने. १०. १५९ व ए. भा. १०. १४) एकनाथ म्हणतात की, 'दूध मिळाल्यावर हे घर ब्राह्मणाचे आहे की अंत्यजाचे याचा विचार मांजर करीत नाही' त्याप्रमाणे '(तेवी) विषय उन्मत्त नर। न करिती विचार सेव्यासेव्य ।।' (ए. भा. ५. २१३)

या ठिकाणी धर्म, नीती ही पुढे येतात. सेव्यासेव्य किंवा ग्राह्याग्राह्य ठरविण्याचे निकष धर्माकडून सांगितले जातात. 'मेघातून बरसणाऱ्या पावसाच्या पाण्याला अडविण्याचे, साठविण्याचे काम धरण करते आणि योग्य वेळेला ते पिकापर्यंत पोहोचावे, यासाठी पाट काढले जातात.' तसेच येथे घडते. '–वासनांच्या स्वाभाविक प्रवाहाला धर्माकडून बांध घातला जाऊन त्यांना योग्य दिशेला नेण्याचे काम नीतीकडून केले जाते.' '(तैसे) उच्छृंखळां विषयासी । वेदे नेमिले नेमेसि । (ए. भा. २१६ व २१८). मराठी संतांच्या म्हणण्याप्रमाणे धर्म व नीती या दोहोंनी हातात हात घालून बरोबरीने चालले पाहिजे. नीतीच्या प्रस्थापनेसाठीच ज्ञानेश्वर, एकनाथ,

तुकाराम यांना तत्कालीन धर्ममार्तंडांशी झगडावे लागले. प्रस्थापित धर्मविचार कालबाह्य झाले होते, मानवी मूल्यांशी त्यांची फारकत झाली होती. त्यामुळे अनैतिकतेशी सोयरिक करून अधर्माच्या पातळीवर पोहोचलेल्या धर्माला सध्दधर्माची प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याची जबाबदारी मराठी संतांना उचलावी लागली. ती त्यांनी कर्तव्यनिष्ठेने पार पाडलेली दिसते. संतांची मूळ भूमिका आध्यात्मिक असून त्यांचे कार्य मात्र समाजसुधारणेचे– नैतिक स्वरूपाचे आहे. धर्मव्यवहारातील संकुचितपणा, दुराग्रह, दांभिकता व दुराचरण यांवर त्यांनी कडाडून हल्ला चढविला. अगदी नामदेवांसारख्या सौम्य वृत्तीच्या संतानेही अशा पाखांड खंडणावर भर दिला आहे.

'आम्हां हे कौतुक जगा द्यावी नीत । करावे फजित चुकती ते ।' किंवा 'वाचा बोलो वेदनीती । करू संतीं केलें तें ॥' तुकारामांच्या या उक्ती संतांचे धर्मसुधारणेचे नैतिक कार्यच स्पष्ट करतात.

**संतांचा धर्मविचार :**

मराठी संतांच्या भक्तियोगात आत्मज्ञान, स्वधर्म–कर्म आणि नीती म्हणजेच समाजधर्म ही तिन्ही अगदी समरसून एकवटलेली आहेत असे त्यांच्या चरित्रांवरून व वाङ्मयामधून प्रत्ययास येते. त्यांचा धर्मविचार अध्यात्म आणि नीती यांनी परिवेष्टित झाला असून तो ईश्वर भक्तीच्या द्वारा प्रकट झाला आहे. ज्ञान आणि कर्म यांची परिणती शेवटी भक्तीत झाली तरच तो संतधर्म ठरतो. दुष्टांच्या निर्दालनाचे काम क्षात्रधर्माचे आहे, पण दुष्टवृद्धी व दुष्ट वासना यांचे निर्दालन करणे हे काम संतांचे आहे. क्षात्रधर्मीयांना शस्त्रांचे, हिंसेचे साहाय्य घेऊन सुराज्य स्थापन करता येते, पण संतांना अहिंसक वृत्तीने आणि सत्याग्रही बाण्याने वाणी व लेखणी यांचे साहाय्य घेऊन प्रबोधन करीत करीत लोकांच्या अंतःकरणात नीतीचे अनुशासन स्थापावयाचे असते. या कार्यात संत पूर्णपणे यशस्वी झाले होते, याची प्रचीती संतवाङ्मयाच्या अध्ययनाने आजही येते. क्षात्रबळाने निर्माण झालेली राज्ये कालांतराने नाहीशी होतात. संतवाणीने लोकमानसामध्ये निर्माण केलेले नैतिकतेचे अधिराज्य त्रिकालाबाधित असते, कारण संतांनी सार्वकालीन लोकहिताच्या कळवळ्याने आणि प्रबोधनाच्या विशुद्ध मार्गाने चिरसत्याचा साक्षात्कार घडवून प्रत्येक व्यक्तीच्या मनात हे धर्म-राज्य किंवा राम-राज्य निर्माण केलेले असते. त्याच्या बळावरच प्रत्येक युगात दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, पारुष्य (निष्ठुरपणा) आणि अज्ञान या आसुरी संपदेशी सामना करीत दैवी संपदेला –ज्ञान, दया, शांती इत्यादींना–विजयी होता येते. दैवी संपत्तीने युक्त असलेले भक्तच या रामराज्याचे वा धर्मराज्याचे एकमेव धनी होऊ शकतात. म्हणून संतांच्या दृष्टीने 'भक्तियोग' हाच आदर्श योग ठरतो.

**भक्तियुगाचा प्रारंभ : दैवतविचार :**

ज्ञानमार्गी वेदांती व कर्ममार्गी मीमांसक भक्तिमार्गाला गौण स्थान देतात. निसर्गशक्तींना देवता मानून देवाणघेवाणीच्या बोलीने प्रार्थनांच्या रूपात केलेली उपासना ही खरी भक्ती नव्हे. भक्तीला अधिष्ठानभूत असलेल्या ईश्वरालाच मुळी वेदांताने मायिक-मिथ्या ठरविले आहे. कर्ममार्गी याज्ञिकांनाही 'यज्ञ' तत्वापुढे ईश्वराची गरज कधी वाटली नाही. औपनिषदिक ब्रह्मवाद आणि पौराणिक मूर्तिवाद यांच्या संकरातून सगुण ब्रह्माच्या रूपात ईश्वर प्रकटला आणि ब्रह्मा–विष्णू–महेश या त्रिमूर्ती कल्पनेतून व पुढे मान्यता पावलेल्या पंचायत संकल्पनेतून विविध दैवतरूपांच्या द्वारा मूर्तिपूजा प्रतिष्ठा पावली. तिन्ही देवतांच्या एकात्मतेतून निर्माण झालेली 'दत्त' ही देवता विविध प्रकारचे 'गुरुमार्ग' व 'सिद्ध संप्रदाय' यांना प्रेरक ठरली आणि मानवीरूपातील गुरूंच्या भक्तीला उधाण आले. तेव्हा योगमार्गातही ईश्वराला व ईश्वरप्रणिधानाला स्थान मिळत गेले. वेदपूर्वकाळापासून चालत आलेली, पुढे काश्मिरी शैवदर्शनात तात्त्विक अधिष्ठान प्राप्त झालेली शिवशक्तीची उपासना नाथसंप्रदायादि मार्गाने महाराष्ट्रातील संतांच्या धर्मविचारात आली. आर्यपूर्वकालीन शिव व शक्ती या देवतांना सामान्यांच्या दृष्टीने विष्णूच्या बरोबरीचे स्थान प्राप्त झाले. वेदातील सूर्योपासना, विष्णू उपासना व्यापक स्वरूपात भागवतधर्माच्या द्वारा संतसाहित्यात आली. ब्रह्मणस्पती वा गणपती ही विद्येची देवताही सकळ कर्मसिद्धीस साहाय्यक होणारी म्हणून संतांना वंद्य वाटली. श्रुतिस्मृतिपुराणोक्त धार्मिक विचारांचा समन्वय शंकराचार्यांच्या काळातील पंचायतन संकल्पनेत घडला तेव्हा शांकरमताचा वेदांत विचार आणि पंचायतनात्मक 'दैवतोपासना' या उभयतांचा अंगीकार तेराव्या शतकापासून मराठी संतांनी केलेला दिसतो. मध्यंतरीच्या काळात नारद व शांडिल्य यांची 'भक्तिसूत्रे' अवतरली.

या सूत्रग्रंथांनी व गीतेने भक्तीला तात्विक अधिष्ठान पुरवून सुप्रतिष्ठित केले. दहाव्या शतकातील भागवत ग्रंथामुळे कृष्णभक्तीला इतके उधाण आले की, भारतातील प्रत्येक प्रांतात वैष्णवधर्माची लाट उसळली. रामानुजादि आचार्यांनी भक्तीला पांडित्याची डूब दिली. तर आळवार–नयनार–दास इत्यादी कवींच्या भावपूर्ण काव्यरचनेने दक्षिणेकडील प्रांतात भक्तीच्या लाटांवर लाटा उसळू लागल्या. दक्षिणेकडून आलेल्या काही लाटांच्या प्रभावाने महाराष्ट्रातही भक्तिपंथ रुजू लागले.

अन्य प्रांतातील भक्तिमार्ग व महानुभवांचा भक्तिमार्ग यांच्याशी तुलना करता वारकरी पंथाचा भक्तिमार्ग आपल्या वेगळेपणाने उठून दिसतो. त्यांचे उपास्य दैवतच वैशिष्ट्यपूर्ण आहे. पुंडलिकाची मातृपितृभक्ती पाहून द्वापारीचा श्रीकृष्ण त्याच्या भेटीला धावत आला आहे. तोदेखील रुक्मिणीशी भांडून किंवा तिच्यावर रुसून दिंडीरवनात आला आहे. तो एकटाच कटीवर हात आणि विटेवर समचरण ठेवून भक्ताची वाट पाहात २८ युगे उभा आहे. (चार वेद, सहा शास्त्रे आणि अठरा पुराणे ही पंढरीच्या विठोबाबद्दल मौन धारण करून बसली आहेत. ' २८ जण उगे आहेत ' असाही अर्थ पाठभेदाने स्वीकारता येतो.) अशा वैशिष्ट्यपूर्ण देवतेशी अनन्यभावाने एकरूप होऊन अद्वैतीभक्तीचे उद्दिष्ट प्रत्यक्षात आणण्यासाठी ज्ञानेश्वर–नामदेवादि संतमंडळींना दोन प्रकारचे परिवर्तन प्रचलित दृष्टिकोनात घडवून आणावे लागले. या परिवर्तनामुळेच महाराष्ट्रातील भक्तिमार्ग वैशिष्ट्यपूर्ण झाला आहे. अनेक क्षुद्र दैवतांना भजण्याचा–निकृष्ट सगुण भक्तीचा प्रकार सर्वसामान्य लोकात रूढ होता. त्यातले वैय्यर्थ्य पटवून देऊन, त्यांच्या स्वार्थानुसारी चंचल श्रद्धेचे निरपेक्ष अशा निष्ठेत ज्ञानेश्वरांनी रूपांतर घडवून आणले. (पाहा–ज्ञाने.१३. ८०७–८२२) त्यासाठी नामदेवांसारख्याचा एकांतिक विठ्ठलनिष्ठेचा आदर्श त्यांनी एका बाजूला स्वीकारला, पण त्याचबरोबर दुसऱ्या बाजूला एकविध निष्ठा अंगी बाणलेल्या नामदेवांसारख्या भक्तांना सगुण भक्तीच्या पलीकडे जाऊन निर्गुण,निराकार अशा चिद्रूपाला ओळखण्याची तात्त्विक शिकवणही त्यांनी दिली. दुसरा दृष्टिकोण जीव–ईश्वर भेद मानून दीनवाण्या वृत्तीने ईश्वराची उपासना करावी असे शिकविणाऱ्या द्वैतवाद्यांचा होता. महानुभावांचा उपासनामार्गही द्वैत भावनेवरच आधारलेला होता. या मार्गाशी ज्ञानेश्वरांच्या पूर्णाद्वैती विचारसरणीचे सख्य होणे कठीणच होते. ' भक्तिमुखाचे श्रेष्ठत्व मान्य करूनही त्याची परिणती अद्वैतनिष्ठेतच झाली पाहिजे ' अशी ज्ञानेश्वरादि संतांची भूमिका होती. अमृतानुभवातील ' द्वैत दशेचे आंगण। अद्वैत बोळगे आपण।' या ओवीत व्यक्त होणाऱ्या तात्त्विक भूमिकेशी जुळती अशीच ही भूमिका होती.

' जें जें भेटे भूत। ते ते मानिजे भगवंत।' अशा वृत्तीने माझ्या व्यापक स्वरूपाला जाणणे आणि याच जाणीवेने मला शरण येणे म्हणजे ' चित्ते मीचि जाहले ' अशा प्रकारे मद्रूप होणे, हे प्रत्यक्ष अनुभवणे हाच खरा 'भक्तियोग ' होय. अशा अद्वैती भक्तीत (अभेदे जो भक्तियोगु। ज्ञाने. १०.११०) भक्त नि भगवंत असे द्वैत संभवतच नाही. ' घटाचा नाश झाला–घट भंगला की, घटातील पोकळी बाहेरच्या पोकळीत मिसळून जाते, तितक्या सहजपणे माझ्याशी एकरूप होणे, म्हणजेच मला शरण येणे होय. ' (ज्ञाने. १८.१३९९) हे पराभक्तीचे वर्णन भावनेनेच जाणले पाहिजे. ' मी होऊनि माते। सेवणे आहे आइते।' (ज्ञाने. १८.१४०५) ही ज्ञानेश्वरांची अद्वैती भक्तीची कल्पना तर्काने समजणार नाही, की कल्पनेने उलगडणार नाही. सहानुभूतीच्या साक्षात्कारानेच प्रत्ययास येईल. संतांचा ईश्वरविचार व भक्तिविचार एकत्रितपणे पाहिल्यास सगुण साकार (दैवते), सगुण निराकार (ईश्वर) आणि निर्गुण निराकार (ब्रह्म) अशा त्रिविध भूमिकांचा त्यांच्या अद्वैती भक्तीत समन्वय झालेला दिसतो.

**संतांचा ' साक्षात्कारवाद ' (Mysticism) :**

ज्ञानेश्वर–नामदेव–तुकाराम इत्यादि संतांनी अद्वैताची आत्मप्रतीती आणि देवभक्त एक झाल्याची अनुभूति प्रत्यक्ष अनुभवली होती असे त्यांच्या उद्गारांनो जाणवते. शाश्वत सत्याचा, विशुद्ध प्रेमाचा आणि दिव्य सौंदर्याचा आनंद त्यांनी ' याचि देहीं याचि डोळां ' अनुभवला होता. पंचविषयांच्या रूपातच पण दिव्यत्वाने प्रतीत होणारा हा साक्षात्काराचा अनुभव शब्दबद्ध करण्याचा प्रामाणिक प्रयत्न सर्वच संतकवींनी केलेला दिसतो. शब्दापलीकडच्या अवस्थेचे वर्णन करताना परस्परविरोधी शब्द, विरोधी कल्पना, विरोधी प्रतिमा यांचा आश्रय त्यांना करावा लागला आहे. ' अणुरणिया थोकडा। तुका आकाशाएवढा।' किंवा 'आपुले मरण

पाहिले म्यां डोळां।' 'मीच मज व्यालों। पोटा आपुलिया आलो।' यांसारख्या उद्गारांनी भरलेले अभंग नादमधुर वाणीने ऐकायला मिळाले की, शब्दार्थांचा उलगडा न होताही रसिक मनाला दिव्यत्वाचा स्पर्श झाल्याचा अनुभव आल्याखेरीज राहात नाही. क्षणभर का होईना उच्चत्वाचा म्हणा किंवा पूर्णत्वाचा म्हणा प्रत्यय आपणास येतो. हीच दिव्यत्वाची अनुभूती होय आणि हीच संतांच्या साक्षात्कारी प्रतिभेची साक्ष होय. उत्कट स्नेहाच्या पोटी श्रीकृष्णांनी अर्जुनाला–उद्धवाला आलिंगन स्पर्शाने ब्राह्मी स्थितीचा साक्षात्कार आणून दिल्याची वर्णने ज्ञानेश्वर–एकनाथांनी केली आहेत, ती नुसती वाचूनही देव–भक्तांच्या सामरस्याची प्रचीती आपणास कशी येते, ते प्रत्यक्ष अनुभवूनच पाहाण्यासारखे आहे. 'दोन सरोवरांचे पाणी उचंबळून एकत्र आल्यावर धवल रंगाचे तरंगच तरंग उसळतात, त्याप्रमाणे कृष्णार्जुनांच्या मिळणीने आनंदकल्लोळच निर्माण झाला.' 'हृदया हृदय येक जाले। ये हृदयीचें तें हृदयी घातले। द्वैत न मोडितां केले। आपणाऐसे अर्जुना॥' (ज्ञाने. १८.१४२१) तेव्हा सुखाचा जो पूर अर्जुनाच्या अनुभवाला आला, त्यात देवही बुडून गेला. देवभक्त सामरस्याचे हे चित्रण भक्तिवाङ्मयात एकमेव म्हणावे लागेल.

ज्ञानेश्वर–एकनाथादि संतांच्या तत्त्वज्ञानाचे, नीतिबोधाचे व व्यक्तित्वाचे मर्म एका शब्दात सांगायचे झाले तर 'सामरस्य' (समरसता) हा शब्द योग्य ठरेल. 'अभेदभक्ती' हा त्यांच्या तत्त्वज्ञानाचा कणा आहे आणि 'सामरस्य' हा अभेदभक्तीचा गाभा आहे. योग, ज्ञान, भक्ती, कर्म या चारही मार्गांचे अंतिम ध्येय सामरस्य हेच आहे. त्यामुळे ज्ञानेश्वरादिकांच्या भक्तियोगात हे चारही मार्ग परस्परपूरक ठरतात, इतकेच नव्हे तर एकवटून अनुभवास येतात. ध्यानयोगी, आत्मज्ञानी, निष्काम कर्मयोगी आणि भगवद्रूप पावलेले संत या साऱ्यांची लक्षणे ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत यांसारख्या ग्रंथातून वाचली तर, ती तत्त्वतः एकच वाटतात. देव-भक्त, गुरु–शिष्य, श्रोता–वक्ता, आशय आणि अभिव्यक्ती, विचार आणि भाषा, तत्त्वज्ञान आणि काव्य यातील द्वैत भाषेपुरते उरते. या दोहोंमधील ऐक्य वा समरसता हीच खरी वस्तुस्थिती आहे. हे अंतःप्रतीतीधर्मी जीवाला जाणवते, म्हणून तर 'आनंदाचे डोहीं आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचे–' असा समरसतेचा, चिद्विलासी पूर्णाद्वैताचा एकात्म अनुभव संतकवींकडून आपणास मिळतो. अशा प्रकाराने समग्रता, समन्वय आणि सामरस्य यांची अनुभूती घेणे, हाच जीवनसाफल्याचा अर्थ, संतांनी मराठी मनाला पटवून दिला आहे. हीच त्यांची थोर सांस्कृतिक कामगिरी होय.

अद्वैती भक्तीच्या वाटेने येणारा साक्षात्काराचा प्रत्यय ही व्यक्तिगत अनुभूती असली, तरी मराठी संतांनी अद्वैती भक्तीची सांगड सामाजिक नीतीशी घातली आहे. ज्ञानमार्गातील अद्वैतबोधाने, योगमार्गातील समाधिसुखाने, भक्तिमार्गातील देव–भक्त यांच्या ऐक्य प्रतीतीने पूर्ण ज्ञान, पूर्ण आनंद व पूर्ण शांती प्राप्त झालेले मराठी संत तत्कालीन सामाजिक कर्तव्यांपासून दूर गेले नाहीत. 'अर्जुना देऊन समाधी। सवेंचि घातला युद्धीं।' हा आदर्श संतांच्या पुढे होता. स्वतः कैवल्याचे अधिकारी झालेले संत अभेदभक्तीच्या बळावर 'मोक्षाची सोडी-बांधी करी।' आणि भक्तिमार्गाच्या द्वारा चौथ्या पुरुषार्थसिद्धीचे वाटप जगामध्ये करीत राहातो. वैदिक धर्माने धर्म, अर्थ, काम, मोक्ष ही मानवी जीवनातील चार मुख्य ध्येये ठरविली असली, तरी संतांनी मोक्षापेक्षा अद्वैतभक्तीलाच 'पंचम पुरुषार्थ' म्हणून श्रेष्ठ स्थान दिले आहे. भक्ती हे नुसते साधन नाही, तर तेच अंतिम साध्य आहे. सायुज्यमुक्तीपेक्षा प्रेमभक्ती हे श्रेष्ठ साध्य आहे. म्हणून भक्तिप्रेमाचे सुख पुनःपुन्हा मिळावे यासाठी संत गर्भवासाचे दुःख पुन्हा पुन्हा सोसायची तयारी दाखवितात. कारण देवापाशी मोक्षाचे गाठोडे नाही, परंतु भक्तावद्दलचे वात्सल्य, प्रेम भरपूर आहे. त्या प्रेमाचा आनंद व त्याची गोडी या त्रिगुणात्मक संसारात व द्वंद्वात्मक जीवनातही मिळविण्याची 'हातवटी' संतांना साधली आहे. आत्मौपम्यवुद्धीने व समत्व भावनेने सर्वांशी–सर्व जीवांशीच नव्हे, तर जड जगातील वस्तुजाताशीही–वागणे, हीच अद्वैतीभक्तीची गुरुकिल्ली गीता–भागवतातील भक्तलक्षणांनी सांगितली आहे. सत्य, अहिंसा, दया (करुणा), सर्वभूतीं समभाव, अमानित्व, अदंभत्व, अक्रोधत्व इत्यादि गुणांचे स्वरूप मराठी संत वैयक्तिक व सामाजिक दोन्ही अंगांनी स्पष्ट करतात. भोवतालच्या लोकांचे सांसारिक जीवन निकोप नि निरामय व्हावे, सर्व बाजूने उन्नत व्हावे यासाठी ज्ञानेश्वरादि संत एकाच वेळी सामाजिक व आध्यात्मिक पातळीवरून आदर्शाची चित्रे रेखाटून लोकांपुढे ठेवतात, असे दिसते.

भूतदयावादी किंवा मानवतावादी आदर्श लोकांपुढे उभा करताना यज्ञ, तप, त्याग, वैराग्य व संन्यास इत्यादींच्या पारंपरिक अर्थात संतांनी पुष्कळच वदल केले आहेत. नामभक्तीला त्यांनी 'यज्ञा'च्या पातळीवर आणले आहें. केवळ कठोर शारीरिक परिश्रम करणे म्हणजे तप नव्हे, ईशचिंतन व नामस्मरण यांनाही 'तपा'ची पदवी संतांनी दिली आहे. संन्यासाश्रमातील त्रिदंड–धारणेकडेही संत नैतिक दृष्टीने पाहातात. जगाला सुख मिळावे म्हणून कायावाचामनाने हिंसेपासून दूर राहून लोककल्याणासाठी झटणे, एवढी व्याप्ती संतांनी 'अहिंसा' धर्माची मानली आहे. सौजन्य, कारुण्य, लीनता, क्षमाशीलता व औदार्य इत्यादि नैतिक गुणांचे उल्लेख आदर्श भक्तीच्या चित्रणात संतांनी केले आहेत. जगातील सर्व प्रकारची दुःखे नष्ट व्हावीत, जगामध्ये शांतीचे–समाधानाचे साम्राज्य नांदावे या हेतूने परम कारुणिक बुद्धीने संत 'बांधिली सोडित, बुडालीं काढित, आर्तांची सांकडी फेडित' आपले जीवन सहजपणे व्यतीत करतात. श्रेष्ठ दर्जाचे अध्यात्म आणि उच्च दर्जाची नीती ही दोन्ही एकच असतात याचा प्रत्यय संतचरित्रांवरून व संतवाणीमधून प्रकट होतो. भक्तांचे सहज वागणे हेच नीतीला आधार होऊन असते. 'जयांचिये लीळेमाजीं नीति। जियाली दिसे॥' (ज्ञाने. ९.१९२) या शब्दात ज्ञानेश्वरांनी आध्यात्मिक प्रकृती लाभलेल्या संतांच्या व्यक्तिमत्त्वाची नैतिक थोरवी गायिली आहे. याच भूमिकेने आपल्या वाग्यज्ञाचे फल म्हणून ज्ञानेश्वरांनी 'पसायदाना'त पुढील मागणे केले आहे. "खलबुद्धीच्या लोकांचा दुष्टपणा नाहीसा व्हावा, सत्कर्मामध्ये त्यांना अधिकाधिक गोडी लागावी, जीवमात्राच्या ठिकाणी परस्परांबद्दल मैत्रभाव (स्नेह) निर्माण व्हावा. मांगल्याचा वर्षाव करणारा ईश्वरनिष्ठांचा संतमेळा भेटून सज्जनांची सोयरिक जगाला लाभावी, पापाचा अंधार नाहीसा होऊन स्वधर्मसूर्याच्या उदयाने सारे विश्व उजळून निघावे सर्व प्राणिमात्राला त्याचे ईप्सित प्राप्त व्हावे, त्यांना दृष्ट–अदृष्ट (लौकिक व पारलौकिक) असे दोन्ही प्रकारचे यश लाभून सर्व पूर्ण सुखी व्हावेत."

– संत हृदयाची थोरवी पटविणारे ज्ञानेश्वरांचे हे मागणे विश्वात्मक देवाने "हा होईल दानपसावो" या शब्दात मान्य केले. तेव्हा 'येणे वरें ज्ञानदेवो। सुखिया झाला।,' (ज्ञाने. १८.१७९३–१८०१). पसायदानाची परिपूर्ती हीच मराठी संतांच्या तत्त्वज्ञानाची सामाजिक परिणती होय.

## साभार स्वीकार

### चरित्रे आत्मचरित्रे

**ड्रग्जच्या जाळ्यात** (रविंद्रसिंगची आत्मकथा) : सुजला नित्सुरे–अनु; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ५० ★ **नेहरु : मोतीलाल–जवाहरलाल** : बलराम नंदा/वासंती फडके–अनु; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ८५ ★ **पारुजी नारायण मिसाळ** : दत्तू गोरें–संपा; इंडिया बुक कंपनी, पुणे ३०; १९८८ रु. २० ★ **कर्मवीर पाटील** : हृ. कि. तोडमल; कांटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. १५ ★ **साठ संमेलनाध्यक्ष**; रा. प्र. कानिटकर; उत्कर्ष प्रकाशन, पुणे ३०; १९८८ रु. ३५ ★ **अक्षरगंधर्व** : सदानंद रेगे; प्र. श्री. नेरूरकर; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८७ रु. ८०.

### लेखन, प्रबंध

**लावण्य यात्रा** : अरुणा ढेरे; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८७ रु. ५० ★ **विपुलाच सृष्टी** : श्री. अ. दाभोळकर; भारत जनविज्ञान जथा, पुणे ४; १९८७ रु. १० ★ **तारतम्य**; स. गं. मालशे; परचुरे प्रकाशन मंदीर, मुंबई ४; १९८७ रु. ५० ★ **बाईमाणूस** : सरोजा परुळकर; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८८ रु. ३५ ★ **बायबलचे मराठी अवतार** : एलायस रॉड्रिग्ज; देवीलक्ष्मी प्रकाशन, पुणे ३०; १९८५ रु. ६० ★ **महाविदर्भातील लोकगीतांचे संगीत** : डॉ. विमल चोरघडे; मनोहर ग्रंथमाला प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ६०.

# भाषा-शोधन (भाषिक व्यवहारातील विवेक)
## लेखांक तिसरा

द. न. गोखले

### ६

### क्रियापदरूप : कर्तरी वाक्यांतील

मराठीत क्रियापदाचे रूप विविध-कार्यकारी असते. म्हणजे क्रियापदरूपावरून बहुधा क्रियापदाचा पुरुष क्रियापदाचे लिंग नि क्रियापदाचे वचन यांचा बोध होतो. उदाहरणार्थ, 'गेला' या रूपावरून क्रियापद तृतीय-पुरुषी, पुलिंगी नि एकवचनी आहे, हे समजते. त्याचप्रमाणे, 'गेलीस' या रूपावरून क्रियापद द्वितीय-पुरुषी, स्त्रीलिंगी नि एकवचनी आहे. हे कळते, त्या रूपावरून 'आख्याता'चा (म्हणजे काळाचा किंवा अर्थाचा) बोध होतो, ही गोष्ट वेगळीच. क्रियापदरूप विविध-कार्यकारी असल्याने त्याचा योग्य वापर कसा करावा, असा प्रश्न अनेकदा उत्पन्न होतो.

क्रियापदरूप कर्तरी प्रयोगात कर्त्यावरून ठरते; कर्मणी प्रयोगात कर्मावरून ठरते. आणि भावे प्रयोगात ते नित्य तृतीय-पुरुषी, नपुंसकलिंगी, एकवचनी असते. संकरप्रयोगात कर्ता, कर्म नि क्रियापदरूप यांचा हा जो त्रिविध संबंध त्याचे काही मिश्रण झालेले असते. शास्त्रीय मराठी व्याकरणाचे कर्ते श्री. मोरो केशव दामले यांना वाट पुसत आपण क्रियापदाच्या रूपाचे नियंत्रण करणाऱ्या शब्दाला क्रियापदरूपेश म्हणू या. अर्थात, कर्तरी प्रयोगात कर्ता क्रियापदरूपेश असतो तर कर्मणी प्रयोगात कर्म क्रियापदरूपेश असते. साहजिकच कर्तृवाचक किंवा कर्मवाचक शब्द अनेक असतील आणि ते भिन्न भिन्न पुरुषात, लिंगात, वचनात असतील, तेव्हा क्रियापदाचे रूप कसे घालावे, कोणाप्रमाणे ठेवावे असा प्रश्न पुढे येतो. कर्ता किंवा कर्म तर भिन्न पुरुषात किंवा लिंगात किंवा वचनात आहे, आणि क्रियापदरूप तर एकच कोणता तरी पुरुष, एकच कोणते तरी लिंग, नि एकच कोणते तरी वचन दाखवू शकते; तेव्हा काय करावे असे या प्रश्नाचे स्वरूप थोडक्यात असते. उदाहरणार्थ 'मी गेलो' या वाक्यात 'मी' हा कर्ता, प्रथम पुरुषी पुलिंगी, नि एकवचनी आहे; म्हणून यावर अवलंबून असणारे 'गेलो' हें क्रियापदही तसेच आहे. पण 'मी आणि सीता गेलो' या वाक्यात 'मी आणि सीता' मिळून कर्ता असून त्यातील मी प्रथम-पुरुषी पुलिंगी आहे तर सीता, तृतीय पुरुषी स्त्रीलिंगी आहे. मग क्रियापद कोणाप्रमाणे हवे असा प्रश्न पुढे येतो. (येथे 'गेलो' हे क्रियापदरूप प्रथमपुरुषी अनेकवचनी नि सर्वलिंगी आहे- आणि ते योग्यही आहे.) कर्तृवाचक किंवा कर्मवाचक सर्व शब्द एकवचनातच असले तरीही क्रियापदाचे वचन कोणते हा प्रश्न संपत नाही. 'रामा नि गोविंदा उद्या पुण्यास जातील' या वाक्यात 'रामा नि गोविंदा' हे कर्ते असून ते दोन्ही एकवचनात आहेत. पण क्रियापद दोन्हीसाठी येत असल्याने ते प्रत्येकाप्रमाणे एकवचनी की दोन्हीचे मिळून अनेकवचनी अशी शंका येते. (येथे 'जातील' अनेकवचनी असून ते योग्य आहे.) कर्तृवाचक किंवा कर्मवाचक काही शब्द एकवचनात तर काही शब्द अनेकवचनात असले, तरी ही शंका येत राहते हे सांगावयास नको. उदाहरणार्थ 'या हातघाईच्या लढाईत मराठ्यांचे पाच सैनिक आणि झुंझाररावासारखे मोहरे मारले गेले' या वाक्यात 'मारले गेले' की 'मारला गेला.' ही शंका उरतेच. (येथे मारले गेले' हे क्रियापद अनेकवचनी असून ते अयोग्य नाही.) प्रश्न नि शंका अशा संपत नाहीत. तेव्हा समावेशक नि साधारण (general) चर्चेची आवश्यकता आहे.

दामल्यांनी या विषयांची चांगली चर्चा १९११ सालीच करून ठेवली असून ती आजच्या प्रमाणे मराठीला-निदान कर्तरी वाक्यापुरती बरीचशी लागू आहे. त्या चर्चेला थोडी फार पुरवणी जोडून तिचे आधुनिकीकरण नि सुलभीकरण पुढीलप्रमाणे करता येईल.

### कर्तरी वाक्यासंबंधी नियम :

**वचन :**

**नियम (१)** : जेव्हा कर्तरी वाक्यातील कर्ते समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययाने जोडलेले असतील

तेव्हा क्रियापद सामान्यत: अनेकवचनी असते.

उदाहरणार्थ, 'रामा त्याची बायको नि मूल एवढ्या जागेत राहू शकतात, ' मी नि तू उद्या वानवडीस जाऊ ' ' घोडा अन् गाय चतुष्पाद आहोत ' ' या दुर्घटनेत तुम्ही आणि तुमचे आप्तस्वकीय पार धुऊन निघालात ' ' अशा वेळी पत्नी आणि भगिनी जगाव्यात '

(समुच्चयबोधक उभयान्वयी अव्यये : आणि, आणखी, आणिक, नि, अन्, व इत्यादी.)

' कर्तरी वाक्यातील कर्ते समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययाने जोडलेले असताना क्रियापद सामान्यतः अनेकवचनी असते ' या नियमाला काही अपवाद आहेत.

अपवाद (अ) : केव्हा केव्हा क्रियापद निकटच्या कर्त्याप्रमाणे नि म्हणून एकवचनी असते.

उदाहरणार्थ ' या जमिनीत ज्वारी व कापूस पिकतो' ' घराभोवतालच्या ओसाड जागेत झुडपे व गवत वाढले आहे ' ' या हातघाईच्या लढाईत पाच सैनिक आणि झुंझाररावासारख्या मोहरा ' मारला गेला '

(' अशा वेळी म्हणजे क्रियापद एकवचनी असताना कर्त्याचा क्रियापदाशी पृथक संबंध दाखविला जातो; मात्र क्रियापद अनेकवचनी असताना सर्व कर्त्यांचा संबंध क्रियापदाशी एकवटीने दाखविला जातो ' असा अर्थभेद काही व्याकरणकार करतात. पण व्यवहारात तशा अर्थभेदाचा प्रत्यय येत नाही. क्रियापदाच्या वचनासंबंधी दोन्ही पर्याय प्रमाण भाषेत चालतात असेच म्हणावेसे वाटते. प्रश्न अर्थभेदाचा असण्यापेक्षा रुचिभेदांचा दिसतो.)

निकटच्या कर्त्याप्रमाणे क्रियापद एकवचनी असू शकते. या अपवादासही एक अपवाद आहे. तो असा की समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययाने जोडलेल्या अनेक कर्त्यांपैकी एखादा तरी कर्ता जेव्हा प्रथमपुरुषी किंवा द्वितीयपुरुषी असतो तेव्हा क्रियापद केव्हाही एकवचनी असत नाही; ते अनेकवचनीच असते.

उदाहरणार्थ ' तो व मी ' (शकुंतला) येथून दुकानात गेलो ' (' गेले ' नाही.) ' वर्गातील मुले आणि तू इतका वेळ काय करीत होतात ?' (' करीत होतास ' नाही.)

अपवाद (ब) : कर्त्यांच्या ठिकाणी येणारी नामे (किंवा नामाप्रमाणे योजलेली विशेषणे) एकाच व्यक्तीस किंवा वस्तूस उद्देशून आली असता क्रियापद एकवचनीच घालतात.

उदा. ' माझा हितचिंतक व पालक मला आज सोडून गेला ', ' त्याचा बाप व माझा वडील भाऊ उद्या यावयाचा आहे ', ' महाराष्ट्र-द्वारकेचा एकमेव आधारस्तंभ, हजारो सामान्यजनांचा दिलासा, विद्वानांचा कंठमणी, स्वातंत्र्यदेवतेच्या हातातला भाला लोकमान्यांच्या मृत्यूमुळे आता नष्ट झाला आहे. '

अपवाद (क) : कर्त्यांच्या ठिकाणी येणारी अनेक नामे नंतर एखाद्या समुदायवाचक एकवचनी नामाने जेव्हा एकत्र निर्दिष्ट केलेली असतात तेव्हाही त्या समुदायवाचकांप्रमाणे क्रियापद एकवचनी असते.

उदाहरणार्थ, ' एक हजार स्वार व दोन हजार पायदळ इतके सैन्य रवाना झाले,' ' त्याला चार मुली व पाच मुलगे एवढी संतती आहे', ' रामा, गोविंदा आणि विष्णु हे त्रिकूट चव्हाटयावर उभे होते. '

**पुरुष :**

नियम (२) : जेव्हा कर्तरी वाक्यातील कर्ते समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययाने जोडलेले असतात आणि त्यापैकी एक तरी कर्ता प्रथमपुरुषी असतो, तेव्हा क्रियापद प्रथमपुरुषी असते. एकही कर्ता प्रथमपुरुषी नसून एकतरी कर्ता द्वितीयपुरुषी असतो, तेव्हा क्रियापद द्वितीयपुरुषी असते आणि एकही कर्ता प्रथमपुरुषी वा द्वितीयपुरुषी नसून सर्व कर्ते तृतीयपुरुषी असतात, तेव्हा क्रियापद तृतीयपुरुषी असते. क्रियापद तीनही प्रकारांत अनेकवचनी असते. आणि त्यांचे लिंग निकटच्या कर्त्याच्या लिंगाप्रमाणे असते.

उदाहरणार्थ, ' मी, तुम्ही आणि शकू उद्याच्या गाडीने निघू. ' ( निघू–ऊ–आख्यातात प्रथमपुरुषी, अनेकवचनी, स्त्रीलिंग किंवा सर्वलिंगी.)

' तू आणि तो आजच निघा. ' ( निघा–ऊ–आख्यातात द्वितीयपुरुषी, अनेकवचनी, पुल्लिंगी किंवा सर्वलिंगी. )

' तू आणि तो उद्या निघाल.' (निघाल–इलाख्यातात द्वितीयपुरुषी अनेकवचनी, पुंलिंगी किंवा सर्वलिंगी.)

' चार उतारू डबे नि दोन वाघिणी रूळावरून घसरल्या ' (घसरल्या–लाख्यातात तृतीयपुरुषी अनेकवचनी स्त्रीलिंगी.)

**लिंग :**

नियम (३–१) : जेव्हा कर्तरी वाक्यातील कर्ते










' समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययाने जोडलेले असतात आणि क्रियापद एकवचनी असते, तेव्हा क्रियापदाचे लिंग निकटच्या कर्त्याप्रमाणे असते. (हा प्रकार वरील नियम अपवाद अ. ब, क, यांच्या कक्षेत येतो.)

उदाहरणार्थ, ' या जमिनीत ज्वारी व कापूस पिकतो.' ' घराभोवती ओसाड जागेत झुडपे व गवत वाढले आहे.' ' या हातघाईच्या लढाईत पाच सैनिक आणि झुंजाररावासारखा मोहरा मारला गेला.' ' माझा हितचिंतक व पालक मला सोडून गेला.' ' त्याला चार मुली व पाच मुलगे एवढी संतती झाली.'

नियम (३ – २) जेव्हा कर्तरी वाक्यातील कर्ते समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययाने जोडलेले असतात. आणि क्रियापद अनेकवचनी असते, तेव्हा सर्व कर्ते पुल्लिंगी असल्यास क्रियापद स्त्रीलिंगी असते. सर्व कर्ते नपुसंकलिंगी वा वेगवेगळ्या लिंगात असल्यास क्रियापद नपुंसकलिंगी असते. (हा प्रकार वरील नियम १ व नियम २ यांच्या कक्षेत येतो.)

उदाहरणार्थ, ' अशा वेळी पत्नी आणि भगिनी कशा जगाव्यात. '

' घोडा आणि बैल भांडत बसले. '

' कुत्री आणि मांजरे अगाला बिलगायची ' (येथे ' चा ' ख्यात मानलेला.)

' आम्ही आणि ते शिपाई ' गंगेतून नावेने निघालो (येथे ' आम्ही ' पुलिंगी मानले किंवा स्त्रीलिंगी मानले किंवा नपुंसकलिंगी मानले, तरी ' निघाले ' क्रियापद योग्य ठरते; कारण ते तिन्हीलिंगी समान आहे )

' बैल नि गाय गोठ्यात गेली ' (' गेली ' नपुंसक' लिंगी.)

' लतिका आणि प्रभाकर ·ओटीवर बोलत बसली - (' बसली '–नपुंसकलिंगी. ' बसले ' सदोष.)

' राम आणि कल्पना सकाळी येऊन गेली ' ('गेली' नपुंसकलिंगी ' गेले '–सदोष.)

नियम (४) : कर्तरी वाक्यातील कर्ते समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययाने जोडलेले असताना वरील १, २, ३ हे नियम लागू पडतात. पण कर्ते विकल्पबोधक उभयान्वयी अव्ययाने जोडलेले असताना हा ४ था नियम लागू पडतो. तो असा :

कर्तरी वाक्यातील कर्ते जेव्हा विकल्पबोधक उभयान्वयी अव्ययाने जोडलेले असतील तेव्हा निकटच्या कर्त्याप्रमाणे क्रियापदरूप ठरते.

उदाहरणार्थ. ' तू अथवा तुझा मुलगा आला म्हणजे मी निघेन ' (येथे निकटचा कर्ता–' मुलगा ' एकवचनी, तृतीयपुरुषी, पुल्लिंगी. म्हणून ' आला ' हे क्रियापदरूप तसेच.)

' तुम्ही किंवा तुमची मुलगी रोज येथे का येते ?'

' आज बाजारात भोपळे किंवा वांगी मुळीच दिसली नाहीत.

(विकल्पबोधक, उभयान्वयी अव्यये : अथवा, किंवा, वा, अगर, की इत्यादी.)

येथे जाता जाता पुढील गोष्टी ध्यानात ठेवण्यासारख्या आहेत.

पतीपत्नी, रामसीता, शंकरपार्वती, नवराबायको, घोडागाडी, मुलगामुलगी, पितापुत्री वगैरे शब्द अनेकवचनी आहेत. ते सामासिक शब्द असून त्यातील अवयव भिन्नलिंगी आहेत. ते इतरेतर द्वंद्व समास आहेत. तेव्हा, असे शब्द कर्त्याच्या ठिकाणी असताना क्रियापद अनेकवचनी नि नपुसकलिंगी हवे

उदाहरणार्थ, ' पतीपत्नी स्कूटरवरून आली '

' आली '–अनेकवचनी, नपुंसकलिंगी. 'आले' हा दोष )

' त्या तसबिरीत रामसीता शोभून दिसली.' (दिसली –अनेकवचनी, नपुसकलिंगी. ' दिसले, सदोष.)–'

दोघे, दोघेजण : हे शब्द अनेकवचनी असून ते दोन लिंगात आढळतात. उदाहरणार्थ दोघे–(मुलगे)–पुंलिंगी. दोघे–(नवरा व वायको)–नपुसकलिंगी. तेव्हा निर्दिष्ट वस्तूप्रमाणे त्या शब्दाचे लिंग मानून क्रियापदरूप ठरवावे.

उदाहरणार्थ, ' दोघे ( = जयंता व सिंधू) सायंकाळी येऊन गेली ' (' गेली '–नपुसकलिंगी). पण ' दोघे (जयंता व वसंता) सायंकाळी येऊन ' गेले ' (' गेले ' पुंल्लिंगी).

' दोघे (जयंता व सिंधू,) येऊन गेले.' (' गेले ' सदोष.) (' गेली ' हवे).

## (७)

## क्रियापदरूप : कर्मणी वाक्यातील

कर्तरी वाक्यातील क्रियापदरूप जसे कर्त्यानुसार असते, तसेच कर्मणी वाक्यातील क्रियापदरूप कर्मानुसार असते. त्यामुळे कर्ते अनेक असताना कर्ता नि क्रियापद यांच्या अन्वयासंबंधी जसा कर्तरी वाक्यात प्रश्न निर्माण

होतो, तसाच तो कर्ते अनेक असताना कर्मणी वाक्यात निर्माण होऊ शकतो. पण त्या अन्वयासंबंधी नियम पुष्कळच सुगम आहेत. खरे म्हणजे, एकच नियम असून तो पुढीलप्रमाणे सांगता येईल

जेव्हा कर्मणी वाक्यात अनेक कर्मे असतात, तेव्हा निकटच्या कर्मानुसार क्रियापदाचे रूप होते.

उदाहरणार्थ, 'त्याने जोंधळे, गहू आणि सायकल आणिली.' ('सायकल' या निकटच्या कर्माप्रमाणे 'आणिली' हे क्रियापद एकवचनी, तृतीयपुरुषी, स्त्री-लिंगी)

'म्हादवाने यंदा दोन म्हशी नि तीन बैल विकत घेतले.' ('बैल' या निकटच्या कर्मासाठी 'विकत घेतले' हे क्रियापद अनेकवचनी, तृतीय पुरुषी, पुल्लिंगी).

'विद्यार्थ्यांनी नियमित अभ्यास नि व्यायाम करावा.' ('व्यायाम' या निकटच्या कर्माप्रमाणे 'करावा' हे क्रियापद एकवचनी, तृतीयपुरुषी, पुल्लिंगी.).

'रामाने रावणाच्या हातून सीता नि लंका सोडविली.' ('लंका' या निकटच्या कर्माप्रमाणे 'सोडविली' हे क्रियापद एकवचनी, तृतीयपुरुषी, स्त्रीलिंगी.)

**अपवाद (अ):** कर्मस्थानी येणारी नामे एकाच व्यक्तीस किंवा वस्तूस उद्देशून असतील, तर क्रियापद एकवचनीच घालतात. उदाहरणार्थ, 'माझा रक्षणकर्ता, माझा भाऊ मी गर्दीत बघितला आणि माझा जीव भांड्यात पडला.' 'आपला झुंजार सेनापती नि मित्र या लढाईत महाराजांनी गमावला.'

**अपवाद (ब):** कर्माच्या ठिकाणी येणारी अनेक नामे नंतर एखाद्या नामाने किंवा सर्वनामाने किंवा विशेषणाने एकत्र निर्देशिलेली असतील, तर ते नाम वा सर्वनाम वा विशेषण कर्ता होते आणि त्यानुसार क्रियापद बनते. उदाहरणार्थ, 'त्याने बटाटे, कांदे, वांगी इत्यादी भाजी विकत घेतली.' 'हुजुरांनी पाचशे स्वार, हजार पायदळ, दोन तोफा, व चार हत्ती एवढी कुमक धाडली.' 'मुलांनी चाकू, कात्र्या, सुऱ्या हाताळू नयेत.' 'आम्ही आंधळे, पांगळे, बहिरे सारे अपंग त्या कार्यक्रमासाठी तयार केले.'

**अपवाद (क):** संबंध वाक्य कर्मस्थानी असून त्याच्या पुढे जर तद्दर्शक नाम वा सर्वनाम आले, तर क्रियापद त्या नामाप्रमाणे वा सर्वनामाप्रमाणे बनते. उदाहरणार्थ, 'त्याला चांगली जागा मिळाली हे मी कालच ऐकले!' 'गोविंदा बी. ए. झाला आणि त्याला नोकरी लागली.' 'या' गोष्टी मी आपल्या डोळ्यांनी बघितल्या.'

अनेक कर्ते असणारे कर्तरी वाक्य आणि अनेक कर्मे असणारे कर्मणी वाक्य यातील मुख्य फरक असा : १) कर्तरी वाक्यातील क्रियापद केवळ निकटच्या कर्त्यावर सामान्यतः अवलंबून असत नाही. पण कर्मणी वाक्यात सामान्यतः ते निकटच्या कर्मावर अवलंबून असते. (२) कर्तरी वाक्यात क्रियापदरूपेश कर्ता नि म्हणून क्रियापद प्रथमपुरुषी, द्वितीयपुरुषी किंवा तृतीयपुरुषी असू शकते. पण कर्मणी वाक्यात कर्म नि म्हणून क्रियापद सामान्यतः तृतीयपुरुषी असते सामान्यतः प्रथमपुरुषी किंवा द्वितीयपुरुषी असत नाही.

## (८)

## क्रियापदरूप : इतर वाक्यातील

संदेहात पाडणाऱ्या क्रियापदरूपांचा कर्तरी व कर्मणी वाक्यांपुरता विचार यापूर्वी भाग (६) व (७) मध्ये झाला. आता फक्त भावेप्रयोगातील वाक्ये नि संकर प्रयोगातील वाक्ये राहिली. पण भावेप्रगातील क्रियापद संदिग्ध वाटण्याचा संभव दिसत नाही; कारण ते नेहमी तृतीयपुरुषी, नपुसकलिंगी एकवचनी असते. उदाहरणार्थ, 'रामाने रावणास मारिले/मारावे' 'त्या मुलांना बैलांना हाकता येते' 'त्याचे निधन झाले.' 'माळावर वाटसरूला सांजावले.'

संकरप्रयोग शक्यतो टाळणे बरे. त्यांचा प्रमाणभाषेत विशेष विचार केलाच पाहिजे, असे नाही.

# पत्रसंवाद । पत्रसंवाद । पत्रसंवाद

१

पुणे. दिनांक १५-१०-८७

संपादक 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' यांना

स. न. वि. वि.

जुलै-सप्टेंबर १९८७ चा अंक अलीकडेच हातात आला. त्यातील पान १ ते ८ वरील व. दि. कुलकर्णी यांच्या 'गंधर्व लोकीचा राजहंस' या लेखाबावत :

बालगंधर्व हे व्यक्तिमत्व आता इतिहास जमा झालेलं आहे. त्या व्यक्तिमत्वाचं आकलन लेखकानं कसं केलं याचं मला कुतुहल वाटलं. काही शंका आल्या. लेखकाचा समीक्षा प्रांतातला अधिकार, वर्णित विषया-बद्दल सार्वत्रिक पूज्यभाव हे मान्य करून पुढील प्रतिक्रिया देतो आहे.

लेखकानं बालगंधर्वांना वयाच्या दहाव्या वर्षी प्रथम पाहिलं. त्यावेळी ते ४५ वर्षांचे होते असे त्यांचे विधान आहे. १९३३ साली. त्यानंतर रंगमंचावर गंधर्वांच्या साठीत पाहिलं १९४८ साली. पहिल्या भेटीत गंधर्व स्नानाला जाताना घेटराच्या आसपास त्यांचं दर्शन झालं. आणि मग त्या बालवयात नाटकाच्या स्टेजवर अनेक वेळा पाहिलं. नाटक डोक्यावरून जात होतं असा लेखकानंच उल्लेख केलेला आहे. या पार्श्वभूमीवर गंधर्वांच्या व्यक्तिमत्वाचं आकलन कसं झालं आहे ते पहा.

विधान १ : त्या वेळी बालगंधर्व सुंदरातल्या सुंदर स्त्रीहूनही सुंदर दिसत होते. पुणे-मुंबईतल्या सौंदर्य सम्राज्ञी बालगंधर्वांसारखं दिसायचा, बोलण्या-चाल-ण्याचा प्रयत्न करतात असं थोरला भाऊ सांगत होता. तो पुढं म्हणाला, 'दहा पंधरा वर्षांपूर्वी तर बालगंधर्व स्वर्गातल्या अप्सरेप्रमाणं दिसायचे.'

माझी शंका : वरील आकलन स्वीकारायचं तर त्या बाल वयात समीक्षाकारांनी जगातल्या सर्व सुंदर स्त्रिया पाहून, परीक्षून मग निर्णय दिला की 'वा, लाजवाब.' इथे अतिशयोक्ती लाजेल असे वाटते. त्यांच्याच पुढच्या वाक्यातली थोरल्या भावाची साक्ष याच जातीची. पुण्या-मुंबईच्या स्त्रिया कसं दिसायचा प्रयत्न करतात यावावतचे विधान पोकळ, वैयक्तिक मत वाटतं. स्वर्गा-तली अप्सरा कुणीही पाहिली नाही. गंधर्व सौंदर्याच्या आकलनाला समीक्षाकार या शब्दांचा आधार का घेतात हे मला समजले नाही.

विधान २ : लहान गावात सगळ्यांना सगळ्यांचं सगळं माहीत असतं. वार्शीतल्या दारूवाजांचे संसार आम्हा लहान मुलांनाही ठाऊक होते.

माझी शंका : पहिल्या वाक्यातलं आकलन स्वीकारा-यला शब्दांवर आंधळी श्रद्धा ठेवायला हवी. दुसऱ्या वाक्यातलं सत्य अत्यंत ठिसूळ वाटतं. दारू, तिचे दुष्परिणाम आणि अंती विणलेला दुःखाचा पट जाण-णारी आणि तीही 'सगळ्यांची सगळे' वार्शीतली त्या काळातली मुले असामान्य प्रतिभेची, सर्वसाक्षी असली पाहिजेत असं गृहीत धरावं लागतं. सामान्यांचं निरीक्षण मात्र याच्या विरोधात जातं.

विधान ३ : वयाच्या पंचविशीत ज्या अनन्यभावानं त्यांनी (गंधर्वांनी) रंगभूमीची पूजा बांधली, तो अनन्य पूज्यभाव त्यांच्या वयाच्या साठी-पासष्ठी मध्येही तसाच टिकून राहिला होता.

माझी शंका : समीक्षाकारांनी गंधर्वांना प्रथम पाहिलं ते गंधर्वांच्या ४५ व्या वर्षी. मग गंधर्वांनी त्यांच्या पंचविशीत ही पूजा कशी बांधली आणि तुलनेनं ती साठीत कशी उतरते याचं आकलन कशावर आधारित आहे ?

विधान ४ : समीक्षाकारांनी गंधर्वांच्या साठी- पास-ष्ठीत अकलूजला त्यांचा सौभद्राचा प्रयोग पाहिला. त्यावेळचं त्यांचे प्रथम आकलन तो अभिनय, ते रूप

पाहवत नव्हतं असं आहे. पुढे प्रयोग रंगत गेला. लेखक समरस झाले. मग त्यांना वार्धक्यातली कुरूपता दिसेनाशी झाली 'प्रतीत होत होतं ते एका युवराज्ञीचं खोल खोल तळातलं अपरंपार दुःख. संगीत रूपानं प्रकटलेलं. प्रेक्षकासाठी उलटलेल्या रुक्मिणीकडं आपल्या कानांनी पाहतात आणि डोळयांना जरा गप्प बसा म्हणून सांगतात असं एक प्रमाणपत्र तिथं नोंदवलं आहे त्याच्या पुढच्या परिच्छेदात एका नव्या नटाला तू न संकोचता तळिरामाची भूमिका करताना मला हात लाव नाही तर सुधाकरांच्या वाक्याला अर्थ राहाणार नाही असं बजावतात.

• माझी शंका : युवराज्ञीचं दुःख प्रतीत व्हायला कुलकर्णी यांनी कोणत्या युवराज्ञीशी जवळीक साधली होती ते स्पष्ट झालेलं नाही. कल्पनेच्या प्रांतात भावलेलं दुःख जाणवलं असं गृहीत धरलं तर ते त्यांचं आकलन अगदीच वैयक्तिक होतं. सार्वत्रिक सनातन सत्याचा अंशही त्यातून दिसत नाही. त्यामुळे आधारहीन वाटतं. पुढच्या वाक्यात डोळयांना गप्प बसा म्हणणारे समीक्षक लगेचच एकच प्याल्यातल्या सिंधूची साक्ष काढून डोळयांची आठवण देतात. त्यांचा अभिनय (गंधर्वांचा) प्रेक्षकांचे डोळे बांधून केवळ डोळयांची किमया वर्णन करीत नाहीत. इथे आकलन कसे स्वीकारायचे ते स्पष्ट व्हायला पाहिजे कारण समीक्षाकारच म्हणून गेले आहेत की अखेर शब्द हेच चिरंजीव साधन आहे. ते मूर्त–अमूर्ताला कवटाळून घेऊ शकतं.'

विधान ५ : गोहर बालगंधर्वांबद्दल, गंधर्वांच्या पतनाचं वर्णन करताना 'एकदा स्वतःचं संपूर्ण दान देऊन टाकल्यानंतर त्यातून त्यांनी पळवाट काढली नाही' असं गुड कांडक्ट सर्टिफिकेट दिलं आहे. त्या आकलनापुढं स्पष्टीकरण असं केलं आहे. 'बालगंधर्वांसारखे जीव एकदा एखाद्याला आपलं मानलं की त्याला अखेरचा श्वास सोडीतो आपलं मानतात. मग ते माणूस त्यांच्याशी क्रूर खेळ खेळो की प्रेमाचा वर्षाव करो ! यांना कशाचीच दाद ना फिर्याद !'

माझी शंका : समीक्षाकारांचं हे आकलन मान्य करायचं तर बालगंधर्वांनी त्यांच्या धर्मपत्नीशी विवाह करताना देव ब्राह्मणासमक्ष जे वचन दिलं होतं, धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि–' याला अर्थ उरत नाही. ज्या स्त्रीचा हात हातात घेताना अत्यंत गंभीर अशी प्रतिज्ञा पतीकडून वदवून घेतली जाते त्या प्रतिज्ञेचा विसर पाडून नंतरच्या दुसऱ्या 'संपूर्ण दानाच्या' गोष्टी आकलनाला सच्चेपणा देतात का याची मला शंका आहे. वाऱ्यावर सोडलेली धर्मपत्नी, कुटुंब, मुलं लेकरं या जीवनातल्या अविभाज्य भागाची आकलनात काहीच बांधिलकी समजायची नाही का ? त्यांनी दुसरीला आपली मानली तेव्हा पहिली त्याही अगोदर आपलीच होती, अखेरच्या श्वासाच्या गोष्टी इथे गैरलागू वाटतात, तेव्हा आकलनात त्रुटी वाटते असं समजायचं का नाही ? दाद आणि फिर्याद आरोपीला नसते. तो ज्यांच्यावर आरोपीनं अन्याय केला ती व्यक्ती आणि समाज यांना असते अशी माझी बालबुद्धी आहे. आकलनात गौरवाचा भाग किती असावा या बाबत समीक्षाकारांनीच मार्गदर्शन करायला हवं लिखित कृतीचं स्वातंत्र्य अशा वैचारिक निबंधाना घेता येईल का हे तपासायला हवं. 'बालगंधर्वांच्या अंत्यक्षणी हे (गोहरसंबंधातलं रहस्य) सांगण्याचा मोह होऊ नये म्हणून त्यांची शुद्ध हरपली. शुद्ध हरपलेल्या अवस्थेत काही दिवस राहून अखेर दुनियेकडे न पाहाता ते तडक निघून गेले ते कायमचेच. हे आकलन म्हणायचे का भोंगळ विधान म्हणायचे. कशाचा काही पत्ता !

बालगंधर्व आणि व. दि. कुलकर्णी या उभयतांच्याबद्दल मला आदर आहे. साहित्य पत्रिकेसारख्या संदर्भ साधनात प्रसिद्ध झालेला हा लेख. त्यात त्रुटी नसाव्यात असे वाटल्यावरून हे चार शब्द लिहिले. आकलन इतके सोपे नसते असे मला वाटते. सर्वज्ञतेचा आव आणून शब्दांचा फुलोरा मांडून ते केले तर माझ्यासारखे वाचक या वरच्या देखाव्याने फसण्याची शक्यता असते अशी माझी सामान्य धारणा आहे. इथे एक मुद्दा मुद्दाम स्पष्ट करतो. लेखातील विधाने स्वतंत्र्यरीत्या खरी असण्याची शक्यता मी नाकारीत नाही. मात्र प्रत्यक्ष लेखात त्यासाठी जो शब्दप्रपंच मांडला आहे तो बरोबर आहे काय एवढीच शंका आहे.

**ना. सं. इनामदार**

( २ )

संपादक

'महाराष्ट्र साहित्य पत्रिका,' पुणे
यांस सप्रेम नमस्कार

जुलै–सप्टेंबर १९८७ च्या आपल्या अंकातील 'गंधर्वलोकीचा राजहंस' या माझ्या लेखासंबंधीचे श्री. ना. सं. इनामदारांचे पत्र आपण माझ्याकडे पाठविले, ते मिळाले. प्रथम, इनामदारांनी माझा लेख बारकाईने वाचला व आपल्या प्रतिक्रिया व्यक्त केल्या याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

श्री. ना. सं. इनामदार यांना आलेल्या शंकांचे वेगळेपणाने काही निरसन करण्याचे कारण आहे, असे मला वाटत नाही. त्यांनी माझा लेख पुन्हा एकदा रसिक मनाने वाचवा, अशी त्यांना माझी कळकळीची नम्र विनंती आहे. बालगंधर्वांवरील माझा लेख हा एक 'वैचारिक निबंध' आहे, अशी इनामदारांची समजूत झाल्याचे दिसते. माझा लेख हा वैचारिक निबंध नाही. बालगंधर्वांचे ते एक सर्जनात्मक ललित आकलन आहे. अर्थात अशा आकलनातही मूळ भावसत्याला ढळ पोचू नये. याची खबरदारी घ्यावी लागते. ती मी घेतलेली आहे, एवढेच येथे नमूद करतो.

व्यक्तिगत प्रत्यक्ष अनुभव हे लेखनाचे मूळ भरभक्कम आधारभूत भांडवल असते, हे जितके खरे; तितकेच आपण वाचलेले, ऐकलेले, पडताळून पाहिलेले जे जे काही असते, तेही लेखकाच्या 'अनुभवदृष्टी'चेच प्राणरूप धन बनत असते. त्या आधारे सर्जनप्रक्रिया समर्थपणे, निकोपपणे सुरू होऊ शकते. स्वतः ना. सं. इनामदार यांच्या कादंबऱ्याच याची मनोहर साक्ष देऊ शकतात. माझ्या लेखातील पृ. ५ वरील 'गाणं हा बालगंधर्वांच्या अभिनयकलेचा आत्मा होता......' या वाक्याने सुरू होणारा परिच्छेद, या संदर्भात पुन्हा आवर्जून पाहावा, असे विनंतिपूर्वक सांगावेसे वाटते.

अधिक काय लिहू ? श्री. ना. सं. इनामदार यांचे पुनश्च आभार मानून मी थांबतो; त्याचबरोबर माझ्याकडून एतत्संबंधीचा पत्रव्यवहारही येथेच थांबविल्याचे नमूद करतो.

कळावे ही विनंती.

आपला
**व. दि. कुलकर्णी**


**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**
(तक्ता क्र. ४ नियम ८ प्रमाणे माहिती पत्रक)
प्रकार : त्रैमासिक
स्वामित्व : माहाराष्ट्र साहित्य परिषद,
पुणे ४११०३०
संपादक : **डॉ. वसंत सखाराम जोशी**
पत्ता : ३८६ मधली आळी, वाई (सातारा)
राष्ट्रीयत्व : भारतीय
प्रकाशक : **महादेव विनायक गोखले**
पत्ता : महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ३०.
राष्ट्रीयत्व : भारतीय
मुद्रक : **महादेव विनायक गोखले**
पत्ता : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता,
पुणे ३०.
मी महादेव विनायक गोखले असे जाहीर करतो की वर दिलेली माहिती बरोबर आहे.
सही– **म. वि. गोखले**


## साभार स्वीकार

### नाटके

**खेळीया** : दत्ता भगत; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; १९८७; रु. १२ ☐ **वाटा पळवाटा** : दत्ता भगत; कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे ३०. १९८८; रु. १५ ☐ **शतखंड** : अजित दळवी; पॉप्युलर प्रकाशन; मुंबई; १९८७; रु. २०



अनुक्रमणिका



: १ :

## बुरख्याआडच्या स्त्रिया

डॉ मेधा कुमठेकर

' बुरख्याआडच्या स्त्रिया ' हा प्रतिभा रानडे यांनी लिहिलेला ग्रंथ वाचकांच्या मनाला हेलावून सोडणारा आहे. मुस्लिम महिलांची मन:स्थिती सूक्ष्मपणे विशद करण्याचा लेखिकेचा प्रयत्न आहे पुण्या-मुंबईसारख्या महानगरीतून महाविद्यालयीन अध्ययन करणाऱ्या काही मुस्लिम युवतींना लेखिका भेटली त्यांचे मनोगत समजून घेऊन बुरखा पद्धतीचा परामर्श इथे तिने घेतला आहे.

आपल्या विवेचनाची पार्श्वभूमी म्हणून प्रतिभा रानडे यांनी कुराण व शरीयत या धर्मग्रंथांची बैठक प्रथम स्पष्ट केली आहे. तसेच अरबस्तान, इजिप्त, तुर्कस्तान, पाकिस्तान अशा मुस्लिम देशातील महिलांच्या परिस्थितीचा त्यांनी ऐतिहासिक आढावा घेतला आहे. लैला, मैमुना, शरीफा, ऐनूर, मदिना, आयेषा अशा मुस्लिम भगिनींनी आपली कहाणी लेखिकेसमोर मोकळेपणाने मांडली आहे. बुरखा वापरण्याचे फायदे आणि तोटे या मुलींनी लेखिकेजवळ सांगितले, ते तिने प्रांजळपणे नमूद केले आहेत. बुरखा वापरण्यात परावलंबनाबरोबरच सुरक्षितता आहे. असा या मुलींचा अनुभव आहे, हे सारेच निवेदन लेखिकेने वस्तुनिष्ठपणे केले आहे.

मुस्लिम स्त्री भारतीय स्त्री आहे; पण हिंदू विवाह कायद्याप्रमाणे तिच्यासाठी स्वतंत्र कायदा करणे आपल्या सरकारला किती अवघड वाटते हे सांगताना लेखिकेचे मन अवघडून जाते. "भारतावर इग्रजांचे राज्य नसते, तसेच रॉय–फुले–आगरकर–कर्वे हे समाज सुधारक झाले नसते तर कदाचित माझीही एक तऱ्हेची 'शाहबानो' होऊ शकली असती !" हा लेखिकेचा विचार मनाला चटका लावतो.

मुस्लिम महिलेचा विचार करताना तिची तुलना हिंदू स्त्रीशी होणे अटळ आहे. मुस्लिम स्त्री बुरख्याआड आहे, तर हिंदू स्त्री आजही बावरलेली आहे. जुन्या रूढी तिला सतावत आहेत. परक्या पुरुषांसमोर तिने ऊठबस करू नये, पदवीधर मुलीलाही माहेर-सासरचा प्रवास करताना वडील, भाऊ किंवा पती सोबतीला असला पाहिजे, तिने आपल्यावरील अत्याचार किंवा जाच निमूटपणे सोसला पाहिजे, ही तिची अजूनही कोंडी आहे. धर्म, देश, संस्कृती, समाजव्यवस्था वगैरे गोष्टी भिन्न असल्या, तरी मुळात सगळीकडच्या स्त्रियांपुढच्या समस्या, त्यांच्या आशा-आकांक्षा, त्यांचे मान-अपमान सारखेच असतात. फरक असतो तो गुणात्मक नसून अंशात्मक असतो.

मुस्लिम महिलेबद्दल एका हिंदू लेखिकेने या पुस्तकात निर्भयपणे लिहिले आहे. तिची अडचण खरी आहे. टीका करावी तर ' हिंदुत्वनिष्ठ ' म्हणून शिक्का बसणार; आणि कौतुक केले की ' वाट चुकलेली ' अशी संभावना होणार ! तरीसुद्धा स्त्रियांच्या समस्यांबद्दल आत्मीयता असल्यामुळे लेखिकेने हा विषय निवडला आहे. पूर्वग्रह बाजूला सारून एका विलक्षण आणि वेगळया अनुभवाला लेखिका सामोरी गेली आहे. महाराष्ट्राच्या समाजशास्त्रीय अभ्यासात या ग्रंथाचे महत्व असाधारण ठरेल.

(बुरख्याआडच्या स्त्रिया : लेखिका : प्रतिभा रानडे, प्रकाशक : श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ३०. पहिली आवृत्ती मे १९८७. पृष्ठे डेमी ३००. मूल्य पासष्ट रुपये )

: २ :

# रघुजी भोसले (दुसरे) यांची अमोल पत्रसंहिता

प्राचार्य डॉ. क. वि. श्रीखंडे

डॉ. शरश्चंद्र कोलारकर हे नागपूरच्या धनवटे नॅशनल कॉलेजमध्ये इतिहासाचे अध्यापन करतात. 'जानोजी भोसले आणि त्यांचा काळ इ. स. १७५५ ते १७७२' हा त्यांचा प्रबंध-ग्रंथ विद्वन्मान्य आहे. नागपूरकर भोसल्यांच्या इतिहासाचा साधन-ग्रंथ म्हणून 'रघुजी भोसले (दुसरे) यांची पत्रे इ. स. १७९४ ते १८१०' हा डॉ कोलारकरांनी संपादिलेला ग्रंथ असाच महत्त्वपूर्ण ठरेल. नागपूरच्या विदर्भ संशोधन मंडळाने प्रस्तुत ग्रंथ प्रकाशित केला आहे. डेमी. २१६ पृष्ठांच्या या ग्रंथात १४८ निवडक पत्रांची संहिता आहे. व्यक्ति-नामसूची व स्थळ-सूची अशा दोन उपयुक्त सूचीही शेवटी दिल्या आहेत.

या १४८ पत्रांपैकी जास्तीत जास्त, म्हणजे ५९ पत्रे रघुजींनी दौलतराव शिंदे यांना धाडलेली आहेत. उरलेली पत्रे बाजीराव पंडित, सर्जेराव घाटगे, बाळाजीपंत नाना गोसावी,, अलीबहादूर गोसावी, अमृतराव गोसावी, यशवंतराव होळकर, छत्रपती स्वामी, बळवंतराव शिंदे व जनरल वेलस्ली यांना उद्देशून लिहिलेली आहेत. लंडनच्या 'इंडिया ऑफिस लायब्ररी'-तील पत्रसंग्रहातून ही सर्व पत्रे निवडण्यात आली आहेत. कुणाला किती पत्रे लिहिलेली आहेत याचा सविस्तर तक्ता संपादकांनी दिला आहे. धर्मराज्य, राज्याचे स्वातंत्र्य, राज्याचे शत्रू आणि मित्र असे विषय तत्कालीन मुत्सद्द्यांना किती महत्त्वाचे वाटत होते याची मार्मिक मीमांसा डॉ. कोलारकरांनी आपल्या बारा पानी प्रस्तावनेत केली असून, अमराठी भाषिक वाचकांसाठी या प्रस्तावनेचा इंग्रजी तर्जुमाही त्यांनी दिला आहे.

पानिपतच्या लढाईनंतर उत्तरेकडील राजकारणात शिंदे, होळकर, गायकवाड, पवार आणि भोसले यांनी प्रामुख्याने भाग घेतला. त्यामुळे पेशवाईच्या अखेर-पर्यंत हिंदुस्थानचे राजकारण करण्याची संधी मराठ्यांना मिळू शकली. या परिस्थितीत नागपूरकर भोसल्यांचे राजकारण बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतातून दिसून येते. त्या काळातील राजकारणात इंग्रजांचे वर्चस्व व शत्रुत्व वाढीस लागले होते. इंग्रजांना मराठ्यांच्या राज्याबद्दल दरारा वाटत असे. त्यात भोसल्यांच्या कर्तृत्वाचा वाटा मोठा होता मराठ्यांचे राज्य बुडे-पर्यंत, मराठे हे हिंदुस्थानचे राज्यकर्ते आहेत हे इंग्रजांनी ध्यानात घेतले होते. मराठी राज्य लयाला गेल्यावर हिंदुस्थान बळकावणे इंग्रजांना सोपे झाले, याचे प्रत्यंतर प्रस्तुत ग्रंथातील पत्रव्यवहारातून नेमकेपणाने येते.

'स्वराज्य रक्षावे, दौलतीचे कल्याण इच्छून चालावे, शत्रूची चाल कोण्या रीतीची पडली, त्यावर नजर राखावी' हेच प्राणतत्त्व रघुजी (दुसरे) यांनी निर-निराळ्या मुत्सद्द्यांना पाठवलेल्या पत्रांतून भरून राहिले आहे. इंग्रजांविरुद्ध एकजूट होण्यासाठी मराठा सरदारां-तील मतभेदाचे प्रश्न मिटले पाहिजेत, हे जाणून त्या दिशेने रघुजीने केलेल्या प्रयत्नांचा तपशील या पत्रांतून समजतो. म्हणूनच मराठ्यांच्या इतिहासाच्या संदर्भ-साहित्यात या पत्रांचे मोल मोठे आहे. असा साधनग्रंथ उपलब्ध करून दिल्यावद्दल डॉ. कोलारकर यांचे मना-पासून अभिनंदन !

(रघुजी भोसले (दुसरे) यांची पत्रे : संपा. डॉ. श. गो. कोलारकर; प्रकाशक : विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर, १. पहिली आवृत्ती १९८६. पृष्ठे डेमी २१६. मूल्य रुपये सेहेचाळीस ) ❖

## साभार स्वीकार

### समीक्षा

**ललित साहित्यातील आकृतीबंधाची जडणघडण** : मधु कुलकर्णी; शुभदा सारस्वत पब्लिकेशन पुणे ५; १९८६ रु. ८५ ☐ **काळोखाचे कवडसे** : अरुणा ढेरे; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८७ रु. ७० ☐ **गो. नी दांडेकरांच्या प्रादेशिक कादंबऱ्या** : डॉ. दादा गोरे; सुवर्णलता पाखाडे, औरंगाबाद; १९८८ रु. ३० ☐ **अश्वत्थाची सळसळ** : ज्ञानेश्वर नाडकर्णी, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८८ रु. १००

## : ३ :

# प्रा. सरदारांच्या प्रबोधन – विचारांची मीमांसा

डॉ. अलका इनामदार

एक समाजमनस्क विचारवंत म्हणून प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार हे बृहन्महाराष्ट्रात ओळखले जातात. लेखणी आणि वाणी या दोन्ही माध्यमातून त्यांचे समाज–प्रबोधनाचे कार्य सतत चालू असते. साहित्य ही व्यक्तीची निर्मिती असली तरी शेवटी तिची सामाजिक फलश्रुती कोणती यावर ह्या साहित्य–निर्मितीची थोरवी अवलंबून असते, या निष्ठेने सरदारांनी आपले सारे लेखन केलेले आहे. संत साहित्यापासून दलित साहित्यापर्यंतच्या आठ शतकांतील साहित्य–निर्मितीचे मंथन ते करतात. आणि साहित्यातून प्रतिबिंबित होणाऱ्या सामाजिक स्थिति–गतीचा मागोवा ते घेतात. सरदारांचे समग्र साहित्य समाजचिंतनाच्या संजीवक मंत्राने भारलेले आहे. त्यामुळेच त्यांच्याविषयीच्या ग्रंथकाराभ्यासाला विशेष महत्त्व आहे.

प्रा. सरदारविषयक असा सर्वांगीण ग्रंथकाराभ्यास मांडणारा प्रबंध-ग्रंथ प्रकाशित झाला आहे. नाशिकच्या मंजुळाबाई क्षत्रिय महिला महाविद्यालयाच्या प्राचार्या डॉ. सौ. सुनंदा मोरेश्वर गोसावी ह्यांनी 'प्रबोधनाचे प्रवक्ते प्रा. सरदार' हा आपला वेधक ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. 'अर्वाचीन गद्याची पूर्वपीठिका', 'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी', 'संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती', 'ज्ञानेश्वरांची जीवननिष्ठा', 'न्या. रानडेप्रणीत सामाजिक सुधारणेची तत्त्वमीमांसा', 'आगरकरांचा सामाजिक तत्त्वविचार' आणि 'महात्मा फुले : विचार व कार्य' हे सरदारांचे स्वतंत्र ग्रंथ आहेत. 'महाराष्ट्र जीवन : परंपरा, प्रगती व समस्या' (दोन खंड) आणि 'संक्रमणकाळाचे आव्हान' हे ग्रंथ त्यांनी संपादिले आहेत. 'सत्याग्रहाचा सामाजिक आशय', 'बुद्धिवादाच्या मर्यादा', 'राजकारणातील तत्त्वज्ञान', 'मोडीत निघालेले जग' असे सुमारे पन्नास निबंध सरदारांच्या नावावर नमूद आहेत.

सरदारांच्या साहित्याचा परामर्श घेणारा एकमेव ग्रंथ 'प्रा. सरदार साहित्य-समालोचन,' हा डॉ. हे. वि. इनामदार आणि डॉ. ल. रा. नसिराबादकर यांनी यापूर्वी संपादित केला आहे. 'प्रबोधनाच्या पाऊलखुणा' (संपादक : डॉ. निर्मलकुमार फडकुले), 'नव्या युगाची स्पंदने' (संपादक : डॉ. प्र. चि. शेजवलकर) आणि 'नव्या ऊर्मी, नवी क्षितिजे' (संपादक : डॉ. ल. रा. नसिराबादकर) हे सरदारांच्या निवडक निबंधांचे तीन संग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

सरदारांचे साहित्य आणि सरदारविषयक साहित्य बारकाईने अभ्यासून डॉ. सुनंदा गोसावी यांनी आपले निष्कर्ष साधार आणि सविस्तर मांडले आहेत. संतांनी समकालीन समाजस्थितीशी मिळते घेऊन समाजजीवनातील भेदभावांचा निषेध केला, संतांची भूमिका सर्व संग्राहक असल्याचे सरदारांनी जे सांगितले आहे, ते त्यांच्या संतभाष्याचे फलित म्हणून लेखिकेने दिले आहे. तसेच सरदारांच्या दलित चिंतनाचे वेगळेपण तिने मार्मिकपणे सांगितले आहे. अस्पृश्यता आजही चिवटपणाने टिकून आहे याचे कारण आपल्या धर्मविचारातच पापयोनित्वाची भयंकर कल्पना आहे, हा सरदारांचा विचार लेखिकेने विशद केला आहे.

सरदारांचे एकूणच समाजचिंतन आणि संतविवेचन, परंपरा आणि नवता यांचा समन्वय साधून कसे व्यक्त होते हे प्रत्ययकारी पद्धतीने मांडण्यात लेखिकेला पुरेसे यश लाभले आहे. म्हणूनच आस्वादक समीक्षेचा एक उत्कृष्ट नमुना या दृष्टीने प्रस्तुत ग्रंथ अभ्यासकांना आवडेल.

( प्रबोधनाचे प्रवक्ते : प्रा. गं. बा. सरदार लेखिका : डॉ. सुनंदा गोसावी, प्रकाशक : चिटणीस, गोखले एज्युकेशन सोसायटी, नाशिक ५. पहिली आवृत्ती ऑक्टोबर १९८६, पृष्ठे डेमो १७०, मूल्य रुपये पन्नास )

□

: ४ :

# मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद

डॉ. ह. बा. कुलकर्णी

आधुनिक मराठीच्या संसारात मराठी व्याकरणाचा अभ्यास प्रामुख्याने दादोबांपासून सुरू झाला. त्यांनी पाश्चात्य व्याकरणकारांचे अनुकरण करून स्वकालीन मराठी भाषेचे व्याकरण लिहिले, त्यानंतर चिपळूणकर, गुंजीकर, राजवाडे, खेर, नवलकर, गोडबोले इ. नी आपापल्या शास्त्रीय भूमिकेतून व्याकरणविषयक चर्चा केल्या व व्याकरण ग्रंथही लिहिले. कै. मो. के. दामले ह्यांनी आपले 'शास्त्रीय मराठी व्याकरण' १९११ मध्ये प्रसिद्ध केले. पूर्ववैयाकरणांचा परामर्ष घेऊन आपल्या व्याकरणाची सिद्धता त्यांनी केली. त्यानंतर १९५१ मध्ये मा. पं सवनीस ह्यांचे 'आधुनिक मराठीचे उच्चतर व्याकरण' प्रसिद्ध झाले. दामले ह्यांच्या व्याकरणातील विचारांची चिकित्सा करून त्यांनी स्वतःचा एक साचा तयार केला. १९६२ मध्ये कै. प्रा. अ गं. मंगरूळकर ह्यांनी पुणे विद्यापीठात केळकर व्याख्यानमालेतील जी पुष्पे वेचिली, त्यांचे पुस्तक 'मराठी व्याकरणाचा पुनर्विचार' ह्या नामाभिधानाने प्रसिद्ध झाले. त्यानंतर १९८७ मध्ये प्रा. कृ श्री. अर्जुनवाडकर ह्यांनी आपला ग्रंथ 'मराठी व्याकरण वाद आणि प्रवाद' ह्या शीर्षकाखाली प्रसिद्ध केला.

स्थूलमानाने बोलायचे झाले तर प्रस्तुत ग्रंथकर्त्यांचे व्याकरणविषयक ज्ञान आणि चिंतन सखोल आहे हे ग्रंथ पाहाणाऱ्यास सहज कळून येते. पहिल्या चार प्रकरणात त्यांनी परंपरा, आदर्श, भाषा आणि व्याकरण ह्यांविषयी सूक्ष्मपणे निरीक्षण केले आहे. पुढील सर्व क्र. पाच ते तेरा प्रकरणात व्याकरणातील विविध विषयांचा नव्या भूमिकेतून ऊहापोह केला आहे. शेवटी संदर्भ–संकेत, टिपणे, विषयसूची इ. ची जोड देऊन विवेचनास साधारपणा आणला आहे. व्याकरणाच्या नव्या अभ्यासकांपुढे त्यांनी समस्या ठेवल्या आहेत, आणि 'माझ्याही मतांचे परीक्षण करण्याचा अन्य अभ्यासकाना अधिकार आहे. तो त्यांनी बजवावा.' (पृ. १९२) असेही विनम्र आवाहन केले आहे. स्वतःची भूमिका आग्रही असली तरी तिचे परीक्षण व्हावे असे वाटणे ही शास्त्र-चिकित्सेस आणि विषयाच्या प्रगतीस प्रतिष्ठा प्राप्त करून देणारी दृष्टी स्तुत्यच आहे.

कै. प्रा. मंगरूळकरांनी मराठीच्या बोली भाषेचे व्याकरण लिहिले जावे असे म्हटले, त्याचा प्रतिवाद प्रा. पु. ग. सहस्रबुद्धयांनी स्पष्टपणे केला आहे. "बोलण्यातल्या भाषेचे व्याकरण कधी कोणाला लिहिता येईल हे मला शक्यच वाटत नाही." (म. व्या. पुनर्विचार प्रस्तावना पृ. २६) असे म्हणून आपले विचार त्यांनी प्रखडपणे व्यक्त केले. अलीकडच्या काळात वर्णनात्मक भाषाविज्ञानाने विद्वज्जनांचे लक्ष वेधून घेतले आहे फर्दिनांद द सोस्यूर, सपीर चॉम्स्की इ. च्या नव्या दृष्टीचा अभ्यास भाषाविज्ञानातून व्याकरणाकडे वळणे साहजिकच आहे. तदनुसार प्रा. मंगरूळकर आणि त्यांचे अनुयायी प्रा अर्जुनवाडकर बोलीच्या व्याकरणाचा पक्ष घेऊन उभे आहेत अर्थात प्रा. अर्जुनवाडकर ह्यांनी दामले व्याकरण व प्रस्तुत ग्रंथही स्वतःच्या बोलीतून लिहिला आहे हा आग्रह व्यक्तिगत दृष्ट्या सयुक्तिक असेल. पण चांद्यापासून बांद्यापर्यंत आणि मुंबईपासून मंगलोरपर्यंत मराठी बोलीच्या ज्या विविध तऱ्हा आहेत, त्या सर्वांना काही विशिष्ट वळण देणे हे व्याकरणकाराचे उचित कर्तव्य आहे की नाही ? 'शुद्ध कसे बोलावे आणि शुद्ध कसे लिहावे.' हा दादोबांचा आग्रह मूलतः त्याज्यच मानला पाहिजे काय ? केवळ बोलीचा भाषाविज्ञानवादी आग्रह कोटचवधी मराठी भाषिकांपुढे कोणती व्याकरणदृष्टी ठेवणार आहे ? म्हणून लिखित भाषा ही शास्त्रचिकित्सेस स्वीकारणे क्रमप्राप्त होते.

प्रस्तुत ग्रंथातील अनेक विषयांसंबंधी मतभिन्नता असणे शक्य आहे. वर्णमालेतील क्ष आणि ज्ञ ह्यांचे लिपिक उच्चाटन अयोग्य आहे असे डॉ. म. अ. मेहेंदळे म्हणतात. आणखीही असेच काही सुचविता येईल. 'ॐ' आणि 'श्री' ही दोन्ही प्राचीन काळापासून वेगळ्या (वरील) पद्धतीने लिहितात. 'ओं' असा कोठे कोठे आकार असला तरी प्रामुख्याने 'ॐ'चाच

प्रसार आहे. तसेच 'श्री' असे कोठे आढळत नाही. छापखान्याच्या सोयीकरिता क्वचित 'श्रवणे', 'श्रद्धा' असे दिसेल. पण 'श्रवण', 'श्रद्धा' असाच परिपाठ आहे. तेव्हा मराठी लिपीमध्ये त्यांचाही समावेश व्हायला प्रत्यवाय नसावा.

संस्कृत-प्राकृतचे ऋण घेऊनच जर मराठी भाषा जन्मली तर त्या भाषांमधून येणारे सामाजिक शब्द स्वीकारण्यात अडचण असू नये. उच्चारदृष्टया मराठीत घरचा > घर्चा, बाजारचा > बाजार्चा अशी रूपे होतात. किंवा, "पत्र पोस्टांत टाक" या बोलीचा उच्चार "पत्र पोस्टाट्टाक" असा झाला तर तो समास मानायचा का? 'दार झाक'चा 'दार्झाक' हा उच्चार समास म्हणावा काय? एखाद्या समासाचा विग्रह 'राजाचा वाडा' किंवा 'राजाकरिता वाडा' असा होऊन समासनाम बदलले तर अर्थदृष्टया किंवा व्याकरणव्यवस्थादृष्टया चूक कोणती? "प्रयोग शरणा: वैयाकरणा:" हे शेवटी गृहीतच् आहे, तर चालू असलेल्या भाषिक घटनांना व्याकरणात स्थान देण्यासाठी व त्यांची व्याकरणिक व्यवस्था लाविण्यासाठी प्रत्येक चिकित्सक व्याकरणकाराला कोठे ना कोठे मिळतेजुळते घ्यावेच लागते.

व्याकरणातील प्रयोग व्यवस्था, पृथक्करण, संयुक्त क्रियापदे इ. सर्वच विषयांचे प्रा. अर्जुनवाडकर अत्यंत सूक्ष्मपणे विवेचन करतात. पण संपूर्ण मराठी व्याकरणाच्या दृष्टीने कोणकोणत्या भूमिकांचा समन्वय व्हायला पाहिजे ह्याबाबत निश्चित मार्गदर्शन करण्याचे कर्तव्य ते स्वीकारीत नाहीत. विभक्ती आणि आख्यात इ. संबंधीही अशीच समस्यांची मांडणी आहे संधी आणि स्वरघात इ. चा विचारही सूक्ष्म झाला आहे. पण अंततोगत्वा एकच विचारदृष्टी गृहीत धरून मराठी व्याकरणाची नवी मांडणी शक्य आहे काय, हेही पाहाणे अगत्याचे आहे. अन्यथा 'वाद आणि प्रवाद' असेच होत राहाणार. दादोबांपासून अर्जुनवाडकरांपर्यंतच्या दीडशे वर्षांच्या कालावधीत ते होत राहिलेच आहेत. पण प्रत्येकजण स्वत:चा पूर्वग्रहाचा एक साचा घेऊनच जोपर्यंत व्याकरणाकडे पाहात राहील, तोपर्यंत मराठी व्याकरणाचा विषय अधांतरीच लोंबकळणार. निश्चित व सर्व समावेशक दृष्टी येणे आवश्यक आहे.

गेल्या पस्तीस-चाळीस वर्षांमध्ये मराठी व्याकरणासंबंधी चर्चाचर्वणे होत राहिली. तरी सामान्य मराठी वाचकांस दादोबा-दामले-जोशी ह्यांचा विसर पडू शकला नाही. विभक्ती, समास इ. संबंधी चर्चाकारांनी नव्या सूचना करूनही दामले-पठडी बदलू शकली नाही, हेही एक सत्यच आहे. संस्कृत किंवा इंग्रजी व्याकरणाचा साचा दादोबादिनी स्वीकारला. मराठी भाषेच्या व्याकरणाचा विचार संपूर्ण व्हावयासाठी संस्कृत व इंग्रजी व्याकरणातील उपयुक्त घटकांचा त्यांना उपयोग करून घ्यावा लागला. त्या साच्यात मराठी भाषेचे व्याकरण अधिकाधिक व्यवस्थितपणे बसविण्याचा प्रयत्न झाला. त्यामुळे ग्रांथिकचे मराठीचेही गेल्या दीडशे वर्षात एक विशिष्ट वळण राहिले. हा त्या व्याकरणकारांचा लाभ आपणास झाला असेच म्हणावेसे वाटते.

नव-भाषा विज्ञानाच्या छायेखाली मराठी व्याकरणाचा विचार होत राहीलच. पण बोलीच्या व्याकरणाचा आग्रह कितपत यशस्वी होईल हा प्रश्न आहे. आज ग्रांथिक मराठीच्या संदर्भातही विविध मते पुढे आली आहेत. बोलीच्या बाबतीत मतमतान्तरांचा पाऊसच पडेल ह्यात शंका नाही. प्रा. अर्जुनवाडकरांनी आपल्या विचारांच्या साच्यातून केलेले विवेचन व्याकरणाच्या अभ्यासकांना आव्हान देऊन उभे आहे हे मात्र निश्चित.

(मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद; लेखक : प्रा. कृष्ण श्री. अर्जुनवाडकर, सुलेखा प्रकाशन, पुणे. मूल्य पासष्ट रुपये)

## साभार स्वीकार

### संस्कृतिविज्ञान, विज्ञान, प्रवास, इतिहास व इतर,

तेलंगणातील अरे मराठा-भाषा व संस्कृती : श्री. रं. कुलकर्णी; महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई; १९८७ रु. ३५. ☐ गोमंतक : प्रकृती व संस्कृती, खंड १; बा. द. सातोस्कर; शुभदा सारस्वत पब्लिकेशन पुणे; १९८७ रु. १५०.






: ५ :

# वाङ्मयाचे महाविद्यालयीन अध्यापन

प्रा. अ. श्री. भडकमकर

गुरुवर्य डॉ. दुर्गादास काशिनाथ संत हे मराठी साहित्याचे एक व्यासंगी प्राध्यापक आणि तत्त्वचिंतक, चिकित्सक, स्वयंप्रज्ञ अभ्यासू समीक्षक म्हणून ओळखले जातात. त्यांच्या गुणी शिष्यवरांनी, ग्रंथरूपाने प्रसिद्ध केलेली गौरवांजली अनेक दृष्टींनीं लक्षणीय ठरावी. 'वाङ्मयाचे महाविद्यालयीन अध्यापन', या ग्रंथाच्या प्रकाशनाने मराठी अभ्यासकांची आणि मराठी भाषिकांची फार मोठी गरज पूर्ण होत आहे ही गोष्ट, डॉ. दु. का. संत गौरव प्रकाशन समितीला अभिमानास्पद आहे.

या ग्रंथाचा समारोप करताना, ग्रंथाचे साक्षेपी संपादक डॉ. मंचरकर म्हणतात, "आधुनिक ज्ञानाची प्रगल्भ जीवनव्यवहाराची मराठी समर्थ माध्यम व्हावी आणि तिच्याद्वारे ते ज्ञान समाजाच्या सर्व थरात पोहोचवावे यासाठी आपण प्रयत्नशील असले पाहिजे. सर्वच आघाड्यांवर एकदम सुरुवात करायला हवी. ज्याने त्याने आपल्या भूमिकेवरून आपला वाटा उचलणे हाच आपला आजचा भाषिक स्वधर्म आहे." (वाङ्मयाचे महा. अध्यापन पृष्ठ ४८१) "हा भाषिक स्वधर्म ज्यांनी जीवनभर यथाशक्ती आचरला त्या गुरुवर्य डॉ. दु. का. संत यांच्या गौरवार्थ सिद्ध केलेला हा ग्रंथही त्या स्वधर्माचरणाचा एक आविष्कार आहे." (पृष्ठ ४८१) या ग्रंथाचे संयोजन आणि संपादनही साक्षेपी आणि काटेकोर करण्याचा प्रयत्न संपादकांनी केला आहे. याला अपवाद जागोजागी राहिलेल्या काही ठळक मुद्रण दोषांचा आहे. या दोषांसंबंधी प्रारंभीच संपादकांनी दिलेले स्पष्टीकरण स्वीकारूनही हे एक गालबोट ग्रंथाला लागले आहे असे म्हणावेसे वाटते.

'संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती ही मातृभाषेच्या समृद्धीसाठी झाली. या घटनेला आता अठ्ठावीस वर्षे होत आली. परंतु मराठी राजभाषा झाली तरी आपण तिला काही 'वैभवाच्या शिरी' पोचवू शकलेलो नाही. मराठीच्या राजधानीत, शहरी, इतकेच नव्हे तर आता ग्रामीण परिसरातही सतत मराठी भाषा आणि मराठी भाषिक अद्यापि दुर्लक्षित राहिलेले दिसतात.

इंग्रजी माध्यमी शाळांतून आपल्या पाल्यांना पाठविण्याची प्रवृत्ती वाढत आहे. मराठी साहित्याच्या विकासावस्थेत प्रथम विष्णुशास्त्री चिपळूणकरांनाही 'I am the Shivaji of Marathi literature' अशी घोषणा इंग्रजी भाषेतूनच करावी लागली, या घटनेला आता शतकाहून अधिक कालावधी लोटला असला तरी सद्य:स्थिती आजही फारशी स्पृहणीय नाही. महाविद्यालयीन क्षेत्रात सर्व स्तरांवर मराठीच्या अध्ययन-अध्यापनाला गळती लागली आहे. नव्या शैक्षणिक धोरणामुळे तर कलाशाखांचा विद्यार्थी मराठीच्या अध्यापनाला अधिकच दुरावणार आहे. आतासुद्धा खऱ्या अर्थाने फक्त दहावी म्हणजे माध्यमिक शालान्त परीक्षेअखेर मराठी सक्तीचे आहे. खरे तर महाविद्यालयीन क्षेत्रात सर्व ज्ञानशाखांना, अगदी शास्त्र शाखेलासुद्धा, पहिल्या काही वर्गांना मराठीचे अध्यापन अनिवार्य केले पाहिजे. या आणि अशा अनेक महत्त्वाच्या मुद्द्यांची सर्वंकष आणि मनमोकळी चर्चा या ग्रंथात झाली आहे ही बाब अत्यंत स्वागतार्ह आहे.

पाचशेहून अधिक पृष्ठसंख्या असलेल्या या ग्रंथात पहिल्या विभागात, गुरुवर्य डॉ. दु. का. संत यांचे व्यक्तिदर्शन त्यांच्या सुकन्या सौ. प्रियदर्शिनी ठकार आणि त्यांचे व्यासंगी विद्यार्थी डॉ. चंद्रकांत वांदिवडेकर डॉ. कोल्हापुरे, प्राचार्य दाणी, आणि गुरुवर्यांचे 'बौद्धिक मित्र' प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी सुमारे अठ्ठयाहत्तर पृष्ठातून घडविले असून त्यात डॉक्टरसाहेबांची 'प्रतिमा' सर्वार्थाने साकार झालेली दिसते. सौ. प्रियदर्शनी यांचा लेख त्यांच्या 'तातां'वरील ममत्वाने ओथंबला असला तरी आपल्या पित्याचा परिचय घडवताना त्या पुरेशा वस्तुनिष्ठही होऊ शकतात हे स्वागतार्ह आहे. डॉ.

चंद्रकांत बांदिवडेकर यांनी खरा शिक्षक अल्पकालातही आपल्या विद्यार्थ्यांवर कोणते भाषिक संस्कार करू शकतो आणि कोणत्या ताकदीचे विद्यार्थी निर्माण करू शकतो हे अत्यंत समर्थपणे साकार केले आहे. मित्र या नात्याने डॉ. संतांच्या उच्च पातळीवरील सौहार्दपूर्ण बौद्धिक मैत्रीचे प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी घडविलेले दर्शन विशेष विलोभनीय वाटते.

डॉ. कोल्हापुरे, प्राचार्य दाणी यांच्या लेखातूनही गुरुवर्यांच्या अनेक व्यक्तिगत वैशिष्ट्यांवर सुंदर प्रकाश पडला आहे. इतकेच नव्हे तर डॉ. वसंत वणकुद्रे यांनी डॉ. संत यांच्याविषयी दिलेली परिचयात्मक संकलनात्मक टिपणेही, डॉ. संत यांच्या चौफेर ज्ञानसाधनेच्या आणि अफाट वाङ्मयीन व्यासंगाच्या आयुष्यभर चाललेल्या तपस्येची अर्थपूर्ण माहिती देतात.

या पहिल्या विभागानंतर, अनुक्रमे वाङ्मयाचे अध्यापन तात्त्विक आणि व्यावहारिक विचार, वाङ्मयाचे अध्यापन काही परिक्षेत्रे, वाङ्मयाचे प्रकारनिष्ठ अध्यापन या विषयांवर विविध विषयतज्ज्ञांनी त्यांचे अभ्यासपूर्ण विचार मांडले असून शेवटी संपादकांनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीत मार्मिक व तितकाच अभ्यासू समारोप केला आहे. असे हे "वाङ्मयाचे महाविद्यालयीन अध्यापन". त्याचे अंतरंग आणि बहिरंग नेटके, वैशिष्ट्यपूर्ण आणि समयोचित उतरले आहे.

वाङ्मयाच्या अध्यापनाचा तात्त्विक आणि व्यावहारिक विचार अनेक अंगांनी करण्यात आला आहे. वाङ्मयाची उद्दिष्टे, स्वरूप, रीती आणि समस्या याविषयी डॉ. सुधाकर देशपांडे यांनी वाङ्मयीन सांस्कृतिक व भाषिक अंगांनी भाषिक वैशिष्ट्यांचा विचार केला असून, साहित्याभ्यास म्हणजे 'दुसरी निर्मिती, नव्हे, ती एक बौद्धिक गुंतागुंतीची प्रक्रिया आहे.' असा त्यांनी प्रतिवाद केला आहे.

डॉ. दु. का. संत यांच्या 'वाङ्मयाचे अध्यापन आणि समीक्षा व संशोधन' या लेखात त्यांच्या अनुभव–व्यासंग–चिंतनाचे सारच आले आहे.

प्राचार्य लीला पाटील या सध्या शिक्षणपद्धतीतील एका कायम जुन्या दुखण्यावर सातत्याने बोट ठेवीत आहेत. विद्यार्थ्यांच्या सर्जनशीलतेचा अभाव ही ती गोष्ट. 'बाबा वाक्यंप्रमाणं' मानणाऱ्या समाजात पालक आणि शिक्षक यांच्याजवळच सर्जनशीलता, मौलिकता, सत्यान्वेषण याविषयी पुरेसा आग्रह धरला जात नाही. विद्यार्थ्याला योग्य आत्मभान येण्यासाठी त्याची सौंदर्यदृष्टी, त्याची कल्पना, त्याची सृजनशीलता या सर्वांना आवाहन मिळाले पाहिजे, 'परीक्षार्थी' बनू पाहणारे शिक्षणाचे सारेच घटक, थोड्याफार प्रमाणात याबाबतीत एक तर उदासीन आहेत किंवा विरोधी भूमिका घेत आहेत. 'अध्ययनातून विद्यार्थ्याने निरीक्षण, विचार, भावना, कल्पना याकडे वळावे यासाठी नेमकी अध्यापकाने कोणती भूमिका घ्यावी यासंबंधी सूत्रबद्ध पण परखड विवेचन, त्यांनी 'वाङ्मयाचे अध्यापन आणि सर्जनशीलता' या आपल्या लेखात केले आहे. प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षणक्षेत्रातच नव्हे तर + २ (अकरावी–बारावी) पासून पदव्युत्तर परीक्षेपर्यंत, महाविद्यालयीन क्षेत्रातही काय शिकवावे इतकाच 'कसे शिकवावे ?' हा प्रश्न आता महत्त्वाचा मानला जातो, मानला गेला पाहिजे, या प्रश्नाची चर्चा 'मराठीचे अध्यापन स्वरूप, उद्दिष्टे व पद्धती' या लेखात प्राचार्य व. सा. रोकडे यांनी केली आहे.

'ग्रामीण भागातील वाङ्मयीन अध्यापनाच्या समस्या' या डॉ. द. ता. भोसले यांच्या लेखात त्यांनी ग्रामीण विद्यार्थी आणि नवखे ग्रामीण प्राध्यापक यांच्या अध्यापन क्षेत्रातली मर्यादांची अत्यंत मनमोकळी चर्चा केली आहे ग्रामीण क्षेत्रात भाषिक अध्यापनाचे काम करणाऱ्या प्राध्यापकांना शहरी सोवळेपणा दाखवून, अध्यापनातील अडचणी झटकून टाकणे परवडणारे नाही. डॉ. भोसले यांचा हा लेख ग्रामीण परिसरातील त्यांच्या दीर्घकालीन अध्यापन कार्यातील चिंतनाचा परिपाक झाला आहे.

डॉ. द. ता. भोसले यांनी आपल्या लेखात आपल्या मताच्या समर्थनासाठी 'भाषेचे व वाङ्मयाचे अध्यापन' या कै. प्रा. स. शि. भावे यांच्या लेखातील काही अवतरणे दिली आहेत. त्याचा प्रतिवाद करताना संपादकीय टीपेत संपादक म्हणतात, '१९७० पासून निरनिराळ्या विद्यापीठातील मराठीच्या अभ्यासक्रमांचा तपशील, मांडणी यात लक्षणीय बदल झालेला आहे. अभ्यास मंडळांनी त्याविषयी जागरूकता दाखविली

आहे. ' ही टिपणी पुरेशी समर्थनीय वाटत नाही. कारण अभ्यासक्रम रचनेत आणि पाठ्यपुस्तकांच्या निवडीबाबत अगदी प्रसिद्ध आणि जुन्या विद्यापीठातही घोळ कायम आहेत आणि अद्यापही नेमल्या जाणाऱ्या विषयांचा आंतरिक परस्पर-संबंध काय ? या अभ्यासातून विद्यार्थ्यांच्या अंगी नेमकी कोणती गुणवत्ता यावी ? या प्रश्नाबाबत विद्यापीठाकडून वा अभ्यासमंडळाकडून मार्गदर्शन होत नाही. ही प्रा. भावे यांची तक्रार रास्त आहे.

शंकर पाटील यांच्या 'वेणा' या कथेच्या निवडीबाबत, ना. धों. महानोर यांच्या 'गांधारी' बाबत, व्यंकटेश माडगूळकर यांच्या 'सत्तांतर' विषयी जे अवाङ्मयीन वाद निर्माण होतात त्यांची काही जबाबदारी अभ्यासमंडळावर येतेच. उद्दिष्टहीन अभ्यासक्रम निर्मितीतून मग ठराविक प्रकाशकांची ठराविक पुस्तके नेमली जाणे ठराविक लेखकांचे ठराविक आणि वैशिष्ट्यहीन ग्रंथ नेमले जाणे, अशा अशैक्षणिक गोष्टी होतात याबाबत आत्मतृप्त राहणे फारसे समाधानकारक नाही. १९७० नंतर निरनिराळ्या विद्यापीठांच्या अभ्यासक्रमांबाबत, अभ्यास मंडळांची जागरूकता आणि उपक्रमशीलता ज्या वेगाने वाढायला हवी तेवढी वाढलेली नाही. उलट गेल्या काही वर्षांत मराठी विषयाच्या अध्यापकांमध्ये विषयाच्या अस्तित्वाबद्दलच चिंता निर्माण झाल्याने काही प्रमाणात आत्मशोध घेण्यापेक्षा, चिंतन आणि व्यासंग या दोन्ही बाबतीत काहीशी उदासीनता वाढलेली आहे. वाङ्मयाचे महाविद्यालयीन अध्यापन अधिक सकस, समृद्ध आणि सर्जनशील कसे होईल याबाबतचे हे चिंतन आणि आत्मशोधन स्वागतार्ह ठरावे.

'वाङ्मयाचे अध्यापन-काही परिक्षेत्रे' या तिसऱ्या विभागात 'भाषाविज्ञानाचे अध्यापन' या लेखात डॉ. कल्याण काळे यांनी भाषाशास्त्राच्या अभ्यासाकडे पाहण्याची बदललेली दृष्टी, त्या विषयाची बदललेली परिभाषा आणि प्रस्तुत विषयातील नव्या संकल्पना यांची शास्त्रीय दृष्टिकोणातून ओळख करून दिली आहे. महाराष्ट्रातील अनेक विद्यापीठातून अजूनही असणाऱ्या जुनाट अभ्यासक्रमात निश्चित कोणते बदल केले पाहिजेत याविषयी विवेचन करून, भाषा विज्ञानाच्या प्राध्यापकाच्या अंगी कोणते गुण विशेष असावेत याचीही त्यांनी चर्चा केली आहे.

महाराष्ट्रातील सर्वच विद्यापीठात साहित्य शास्त्र, सौंदर्यशास्त्र, समीक्षाशास्त्र यांचा वर्षानुवर्षे पठडीबद्ध अभ्यासक्रम शिकविला जात आहे. एक तर मराठीला स्वतःचे असे साहित्यशास्त्र नाही. परंतु याबाबत प्रादेशिक भाषेला आजच्या संक्रमण अवस्थेत स्वायत्त असे निखळ परिपूर्ण समीक्षाशास्त्र असू शकेल काय ? हा प्रतिप्रश्न विचारता येईल. समीक्षा ही वस्तुनिष्ठ असूच शकणार नाही असेही एक मत या क्षेत्रात आग्रहाने मानले जाते. या संबंधीचे सध्याच्या समीक्षाशास्त्राच्या अभ्यासक्रमनिर्मितीतील आणि अध्यापनप्रक्रियेतील अराजक कसे नष्ट करता येईल याची साधार चर्चा प्रा. य. शं. कळमकर यांनी 'समीक्षेचे अध्यापन' या लेखात केली आहे. एका विद्यापीठात एम. ए. परीक्षेसाठी नेमलेल्या समीक्षाशास्त्राच्या चालू अभ्यासक्रमाचे उदाहरण देऊन प्रा. कळमकर यांनी त्यातील विसंगतीची चिकित्सा केली आहे. परंतु एवढ्यावरच न थांबता या विसंगती दूर कशा करता येतील, त्यासाठी समीक्षाशास्त्र शिकविणाऱ्या प्राध्यापकांनी नेमकी कोणती काळजी घेतली पाहिजे याचेही सोदाहरण आणि सखोल विवेचन त्यांनी केले आहे. प्रा. हृ. श्री. शेणोलीकर यांचा, 'वाङ्मयेतिहासाचे अध्यापन' हा लेख या क्षेत्रातील त्यांच्या अधिकाराची योग्य जाणीव करून देणारा आहे.

'वाङ्मयाचे अध्यापन तात्त्विक आणि व्यावहारिक विचार' आणि 'वाङ्मयाचे अध्यापन काही परिक्षेत्रे' या दोन विभागामध्ये प्रामुख्याने तात्त्विक विवेचन असल्याने या संबंधीच्या विविध लेखात परस्परविरोधी मते मांडली गेली आहेत. चर्चेत काही लेखातून परस्परभिन्न अशा टोकाच्या भूमिकाही घेतल्या गेल्या आहेत. परंतु या संबंधी या विभागांना जोडलेल्या परिचयपर लेखामध्ये या विविध मतमतांतरांचा चिकित्सक परामर्श डॉ. मंचरकर यांनी घेतला असून वाङ्मयीन अध्यापन क्षेत्रात असे मतभेद कसे अपरिहार्य असतात याचीही साधार चर्चा केली आहे.

'लोकसाहित्याचे अध्यापन' या लेखाचा समारोप करताना डॉ. गंगाधर मोरजे यांनी मांडलेले 'लोकसाहित्यातील शब्दसंकेत, मुद्रासंकेत, प्राक्कथा, अभिनय संकेत, आविष्कार संकेत, विधिसंकेत, हे परंपरेने स्वीकारलेले असतात. त्या संकेतामागे कोणते तत्त्वज्ञान,

सौंदर्यतत्त्व नीतीतत्त्व अनुस्यूत असते याचा अन्वयार्थ समीक्षकाने लावायचा असतो. असे करीत असताना विशिष्ट एका तत्त्वाची किंवा विचारधारेची बांधिलकी स्वीकारून समीक्षा समृद्ध होणार नाही' हे मत चिंत्य आहे. लोकसाहित्याचा चिकित्सक अभ्यास करणे आणि मोकळ्या मनाने त्याचा रसास्वाद घेणे ह्या दोन्ही गोष्टी ग्रामीण आणि नागर अभिरुचींची अभिवृद्धी होण्याच्या दृष्टीने आवश्यक आहेत.

एका लेखकाचा अभ्यास नेमताना अर्वाचीन आणि प्राचीन असा विचार होणे आवश्यक आहे का? या मुद्याचाही विचार व्हावा या संदर्भात डॉ. कटांवळे यांनी केलेली चर्चा विचाराई आहे.

'वाङ्मयाचे प्रकारनिष्ठ अध्यापन' या विभागात कविता, कथा, कादंबरी, नाटक, वैचारिक लेखन या वाङ्मय प्रकारातील साहित्यकृतींच्या अभ्यासप्रक्रियेत कोणकोणत्या घटकांचा विचार करणे अगत्याचे आहे याचा विस्तृत परामर्श डॉ. रत्नाकर मंचरकर, प्रा. चंद्रकुमार नलगे, डॉ. अ. रा. तोरो, डॉ. वा. पु. गिंडे, डॉ. वसंत स जोगी, डॉ. अनुराधा पोतदार आणि प्रा. पुष्पा भावे यांनी घेतला आहे या प्रत्येक प्रकाराच्या अध्यापन-प्रक्रियेशी या प्रत्येक समीक्षकाचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व निगडीत झाले आहे. प्रत्येकाचा अध्यापन क्षेत्रातील व्यासंग आणि अनुभव विपुल आहे. त्यामुळे प्रत्येकाचे या क्षेत्रातील स्वतंत्र असे मत-प्रतिपादन आहे. त्यामुळे त्यांच्या विवेचनात परस्पर मतभेदाचे काही मुद्दे निर्माण झाले आहेत.

एकूण या सर्व विभागातील मान्यवरांच्या लेखांतील वैशिष्ट्यपूर्ण व विदग्ध विवेचनाने हे 'वाङ्मयाचे महाविद्यालयीन अध्यापन' संपन्न झाले आहे. या ग्रंथाची निर्मिती ही एक आवश्यकता होती. या उपक्रमातून केवळ गुरुवर्य डॉ. दु. का. संत यांचाच यथार्थ गौरव झाला आहे असे नसून गेली काही वर्षे मराठी अन्याय निवारण परिषदेचे जे कार्य चालले आहे त्याला हा ग्रंथ पूरक असा ठरला आहे ही समाधानाची बाब आहे. या ग्रंथाचे वाचन मराठीचे प्राध्यापक तर करतीलच पण पदव्युत्तर विद्यार्थ्यांनाच नव्हे तर पदवी पातळीवरील वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांनाही हा ग्रंथ वाचण्याजोगा झाला आहे. मराठीच्या प्राध्यापकांबरोबरच इंग्रजी आणि हिंदी विषयाच्या प्राध्यापकांनाही हा ग्रंथ वाचनीय वाटेल असा विश्वास वाटतो.

('गुरुवर्य डॉ. दु. का. संत गौरवग्रंथ': वाङ्मयाचे महाविद्यालयीन अध्यापन: संपादक डॉ. र. बा. मंचरकर, सौरभ प्रकाशन आणि वितरण, कोल्हापूर. आवृत्ती पहिली १७ मे १९८७. मूल्य रु. एकशेवीस)

□

# दक्षिण रत्नागिरी साहित्य संघ, सावंतवाडी, आणि महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने लेखक मेळावा

दक्षिण रत्नागिरी साहित्य संघ, सावंतवाडी या संस्थेने महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सहकार्याने दि. ६ व ७ फेब्रुवारी १९८८ रोजी सावंतवाडीच्या श्रीपंचम खेमराज महाविद्यालयाच्या 'विद्यार्थीसदन' सभागृहात एक लेखक मेळावा आयोजित केला होता. पुण्याहून साहित्य परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील, कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी, कोषाध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्यवाह श्री. राजा फडणीस, 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चे संपादक डॉ. वसंत स. जोशी आणि साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य प्रा. गो. म. कुलकर्णी व डॉ. लीला गोविलकर ही सर्व मंडळी मेळाव्यात सहभागी होण्यासाठी आली होती.

दि. ६ फेब्रुवारी रोजी संध्याकाळी प्रसिद्ध साहित्यिक आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांनी दीपप्रज्वलन करून मेळाव्याचे उद्घाटन केले. याप्रसंगी द. र. साहित्य संघातर्फे श्री. शंकर पाटील यांचा शाल आणि श्रीफळ देऊन सत्कार करण्यात आला. रात्री श्री. शंकर पाटील यांच्या कथाकथनाचा बहारदार कार्यक्रम झाला. या कार्यक्रमाच्या निमित्ताने सावंतवाडीकर रसिकांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या साहित्यिक साहाय्य निधीसाठी तीन हजार तीनशे तीस रुपयांची देणगी दिली. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष आणि प्रसिद्ध कथाकार श्री. राजेन्द्र बनहट्टी यांनी "या वर्षात एक लाख रुपयांचा निधी पूर्ण करण्याचे साहित्य परिषदेचे नजिकचे उद्दिष्ट होते. त्याची पूर्तता सावंतवाडीकरांच्या या देणगीमुळे झाली आहे. संकल्पपूर्तीचे श्रेय सावंतवाडीकरांना आहे" अशा शब्दात सावंतवाडीच्या साहित्यप्रेमी रसिकांचा गौरव केला.

मेळाव्याचे दुसरे सत्र रविवार दि. ७ फेब्रुवारी रोजी सकाळी ९-३० वाजता कविसंमेलनाने सुरू झाले. प्रसिद्ध समीक्षक आणि म. सा. प. चे कोषाध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर हे कविसंमेलनाचे अध्यक्ष होते. ख्यातनाम कवी डॉ. वसंत सावंत यांनी कविसंमेलनाचे सूत्रसंचालन केले. या कविसंमेलनात सर्वश्री आ. द. राणे, विद्याधर भागवत, डॉ. लीला गोविलकर, संतोष शेणई, दि. मो. दुधगावकर, मदन हजेरी, आ. सो. शेवरे, मालवणी कविता फेम दादा मडकईकर, उदय खानोलकर हे नेहमीचे कवी होतेच. पण वनिता शिरसाट, रामचंद्र शिरोडकर, विनायक गणपुले या नवोदितांनी देखील कविसंमेलनात भाग घेतला. गोव्याहून मुद्दाम आलेल्या कवयित्री नीना समुद्र आणि गिरिजा मुरगुडी रसिकांची दाद घेऊन गेल्या. अखेरीला अध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी आपल्या विनोदी कविता सादर करून बहार उडवून दिली. हे कविसंमेलन अपेक्षेपेक्षा जास्त रंगले.

तिसऱ्या सत्रात 'साहित्य आणि राजकारण' या विषयावर परिसंवाद झाला. अध्यक्षस्थानी श्री. राजेन्द्र बनहट्टी होते. प्रसिद्ध समीक्षक प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. गं. ना. जोगळेकर आणि डॉ. लीला गोविलकर यांनी या परिसंवादात भाग घेतला. श्री. राजेन्द्र बनहट्टी यांनी अध्यक्षीय समारोप केला. साहित्य आणि राजकारण या विषयावरील एक वैचारिक मेजवानी या परिसंवादाच्या रूपाने सावंतवाडीच्या रसिकांनी मिळाली.

परिसंवादानंतरचा आकर्षक कार्यक्रम 'साहित्यिक गप्पा' हा लेखक मेळाव्यातला शेवटचा कार्यक्रम होता. अध्यक्ष श्री. शंकर पाटील होते. या साहित्यिक गप्पांमध्ये प्रा. पां. ल. येजरे, विद्याधर भागवत, तुकाराम नाईक, डॉ. वसंत सावंत, प्रा. ह. व्यं. देशपांडे या लेखक-वाचकांनी श्री. शंकर पाटील, श्री. राजेन्द्र बनहट्टी, डॉ. गं. ना. जोगळेकर, प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. वसंत जोशी, श्री. राजा फडणीस यांना विविध वाङ्मयीय प्रश्न विचारून गप्पांमध्ये रंगत आणली. साहित्यिक गप्पांच्या कार्यक्रमाबरोबरच दोन दिवसांचा हा लेखक

मेळावा समाप्त झाला.

द. र. साहित्य संघाचे कार्यवाह श्री. हरिहर आठल्येकर यांनी अखेरीला आभारप्रदर्शन करताना महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सहकार्याचा तसेच मेळाव्यासाठी आर्थिक साहाय्य करणाऱ्या सावंतवाडी नगरपालिकेचा आवर्जून उल्लेख केला. आणि साहित्यिक साहाय्य निधीला देणगी देणाऱ्यांचे आणि मेळाव्यासाठी सहकार्य करणाऱ्या सर्वांचे आभार मानले.

सावंतवाडीत दोन दिवस यशस्वीरीतीने पार पडलेला हा लेखक मेळावा म्हणजे एक छोटेसे साहित्य संमेलनच होते. या मेळाव्याच्या यशाचे श्रेय साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य कविवर्य डॉ. वसंत सावंत आणि त्यांचे सहकारी यांच्याकडे जाते.

## महाराष्ट्र साहित्य परिषद

# साहित्यिक साहाय्य निधी

वृद्ध, अपंग आणि निराधार साहित्यिकांना आर्थिक साहाय्य देण्यासाठी सांप्रतच्या कार्यकारी मंडळाने साहित्यिक साहाय्य निधी जमा करण्याची योजना हाती घेतली. या निधीला सढळपणे देणग्या देऊन साहित्यिकांबद्दलची आपली कृतज्ञता साहित्यप्रेमी जनतेने व्यक्त करावी, असे आवाहन वेळोवेळी करण्यात आले होते. या आवाहनाला उत्तम प्रतिसाद मिळाला असून एक लक्ष रुपयांचा निधी जमविण्याचे साहित्य परिषदेचे नजिकचे उद्दिष्ट पूर्ण झाले आहे, हे नमूद करण्यास आनंद होतो.

दि. ३१ मार्च १९८८ अखेरपर्यंत साहित्य परिषदेकडे जमा झालेल्या देणग्यांचा तपशील याच अंकामध्ये देण्यात आला आहे.

या अपूर्व उपक्रमाचे महत्त्व आणि आवश्यकता ओळखून हा निधी असाच पुढे चालू ठेवावयाचे योजिले आहे. सर्व साहित्यप्रेमी रसिकांनी जास्तीत जास्त रकमेची देणगी रोख, चेकने किंवा ड्राफ्टने ‘महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे’ या नावाने पाठवावी, अशी आग्रहाची विनंती आहे. या निधीसाठी दिलेल्या देणगीला आयकरातून सूट मिळणार असून देणगीची रीतसर पावती लगेच पाठविण्यात येईल. देणगीदारांची नावे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकातून प्रसिद्ध करण्यात येतील.

आपले

| शंकर पाटील | राजेन्द्र बनहट्टी | गं. ना. जोगळेकर |
|---|---|---|
| अध्यक्ष | कार्याध्यक्ष | कोषाध्यक्ष |

राजा फडणीस, ज्योत्स्ना देवधर, प्रभाकर अत्रे

कार्यवाह



अनुक्रमणिका

# कै. भीमराव कुलकर्णी स्मारक निधी

## सभासदांचे आभार

प्रसिद्ध साहित्यिक आणि मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष डॉ. भीमराव कुलकर्णी यांचे दि. २७–९–१९८७ रोजी शोचनीय निधन झाले. डॉ भीमराव कुलकर्णी यांचा साहित्य परिषदेशी गेली पंचवीस वर्षे अतिशय जवळचा संबंध होता. साहित्य परिषदेचे कार्यवाह, कार्याध्यक्ष आणि साहित्य पत्रिकेचे संपादक म्हणून त्यांनी साहित्य परिषदेची प्रदीर्घ आणि बहुमोल सेवा केलेली आहे. म्हणून साहित्य परिषदेने त्यांचे स्मारक करण्याचा निर्णय घेतला आणि त्यासाठी निधी जमविण्याचे ठरविले होते. साहित्य परिषदेच्या सभासदांनी या स्मारकनिधीसाठी देणग्या पाठवाव्या आणि हा निधी उभारण्यात सहकार्य द्यावे, अशी विनंती केली होती. या विनंतीला साहित्य परिषदेच्या सभासदांनी उत्तम प्रतिसाद दिलेला असून ३१ मार्च १९८८ अखेर या निधीत दहा हजार रुपयांपेक्षा जास्त रक्कम जमा झालेली आहे. या निधीच्या व्याजातून डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या स्मरणार्थ दरवर्षी साहित्य परिषदेतर्फे पारितोषिक देण्याची योजना विचाराधीन आहे. योजनेचा तपशील लवकरच जाहीर करण्यात येईल. आमच्या विनंतीला मान देऊन ज्यांनी हा निधी जमविण्यास हातभार लावला त्या सर्वांचे आम्ही मनःपूर्वक आभारी आहोत.

आपले

| **शंकर पाटील** | **राजेन्द्र बनहट्टी** | **गं. ना. जोगळेकर** |
|---|---|---|
| अध्यक्ष | कार्याध्यक्ष | कोषाध्यक्ष |

**राजा फडणीस, ज्योत्स्ना देवधर, प्रभाकर अत्रे**
कार्यवाह

# कै. भीमराव कुलकर्णी स्मारक निधी

## ३१–३–८८ पर्यंत परिषदेकडे आलेल्या देणग्यांचा तपशील

| देणगीदाराचे नाव | रक्कम रुपये |
|---|---|
| श्री. रमेश मंत्री, मुंबई | ५००–०० |
| डॉ. प्र. शं. मराठे, वाई | १५१–०० |
| श्री. संजय हेमंत इनामदार, पुणे | २५१–०० |
| श्री. श्याम कोपर्डेकर, पुणे | १०१–०० |
| श्री. व्यवस्थापक ‘सन् पब्लिकेशन्स’ पुणे | १०१–०० |
| डॉ. चंद्राताई शेणोलीकर, तासगाव | १०१–०० |
| श्रीमती पद्मा गोळे, पुणे | १०१–०० |
| प्रा. सौ. शकुंतला आठवले, चाळिसगाव | १०१–०० |
| डॉ. चंद्रशेखर बर्वे, पुणे | १०१–०० |
| प्रा. वि. शं. चौघुले, मुंबई | १००–०० |
| डॉ. व. दि. कुलकर्णी, पुणे | १००–०० |
| डॉ. वि. रा. करंदीकर, पुणे | १००–०० |
| श्री. भा. पं. बहिरट, पंढरपूर | १००–०० |
| डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर, मुंबई | ५१–०० |
| प्रा. वसंत दीक्षित, अहमदनगर | ५१–०० |
| प्रा. सुभाष आरवाडे, सांगली | ५१–०० |
| प्रा. सौ. शोभा आरवाडे, सांगली | ५१–०० |
| श्री. कृ. ह. केळकर, सोलापूर | ५१–०० |
| प्रा. प्रभाकर उर्ध्वरेषे, पुणे | ३१–०० |
| श्री. भास्कर धोंडो कर्वे, पुणे | २५–०० |
| श्री. बदिउज्मान खावर, दापोली | २५–०० |
| श्री. द. बा. डावरे, अहमदनगर | २५–०० |
| प्रा. सीताराम गोसावी, कोपरगाव | ११–०० |
| श्री. अनिल गोडबोले, पुणे | १०–०० |
| (पुढे चालू) | २२९०–०० |



अनुक्रमणिका



| देणगीदाराचे नाव | रक्कम रुपये |
| --- | --- |
| (मागील पानावरून) | २२९०–०० |
| श्री. शं. ना. नवरे, डोंबिवली. | ५१–०० |
| श्री. वा. य. पांगारकर, बडोदे. | ५०१–०० |
| प्रा. म. द. हातकणंगलेकर, सांगली | १०१–०० |
| प्रा. द. पं. जोशी, हैद्राबाद | १०१–०० |
| प्रा. ल. के. कुलकर्णी, अमळनेर | २५–०० |
| श्री. 'अनामिक' मुंबई | ५१–०० |
| श्री. वि. ना. थत्ते, औरंगाबाद | १००–०० |
| श्री. वसंत आत्माराम आपटे, फोंडाघाट | २५–०० |
| श्री. विनायक देशपांडे, पुणे | २५–०० |
| प्रा. वसंत कानेटकर, नाशिक | १११–०० |
| श्री. स. मा. गर्गे, पुणे | १००–०० |
| डॉ. न. चि. जोगळेकर, पुणे | १०१–०० |
| श्री. एम्. एन्. जोगळेकर, पुणे | २०१–०० |
| प्रा. ग. प्र. प्रधान, पुणे | ५१–०० |
| श्री. मदन धनकर, चंद्रपूर | ५१–०० |
| डॉ. द. दि. पुंडे, पुणे | १०१–०० |
| डॉ. वि. भि. कोलते, नागपूर | १००–०० |
| डॉ. ब. स. जोशी, वाई | ५०–०० |
| डॉ. वा. के. लेले, वाराणशी | ५०–०० |
| डॉ. बाबा कलगुटकर, मुंबई | १००–०० |
| डॉ. मुकुंद कृष्णाजी गोडबोले, पुणे | १०१–०० |
| श्री. विजया शामराव पुणेकर. मुंबई | १०१–०० |
| अध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा–कोल्हापूर | ५०१–०० |
| डॉ. विलास खोले, पुणे | १००–०० |
| डॉ. ललिता कुंभोजकर, पुणे | १००–०० |
| डॉ. अंजली सोमण, पुणे | १००–०० |
| देणगीदाराचे नाव | रक्कम रुपये |
| प्रा. रेखा इनामदार–साने, पुणे | १००–०० |
| प्रा. शैला काळकर, पुणे | १००–०० |
| प्रा. मंजिरी नेऊरगावकर, पुणे | १००–०० |
| प्राचार्य कमलाकर श्रोखंडे, पुणे | १००–०० |
| सौ. कला खडेराव देशमुख, पुणे | १००१–०० |
| श्री. वि. म. चांदोरकर, मुंबई | २५–०० |
| श्री. य. वि. भातखंडे, मुंबई | २५–०० |
| डॉ. वसंत सावंत, सावंतवाडी | ५१–०० |
| श्री. वि. पां. देऊळगावकर, गुलबर्गा | १००–०० |
| डॉ. सुरेन्द्र बारलिंगे, पुणे | २५–०० |
| पं. सुमित्रिबाई ने. शहा, सोलापूर | १०१–०० |
| श्री. शशिकला काकोडकर, पणजी–गोवा | ५००–०० |
| श्री. शांता शेळके, पुणे | १०१–०० |
| श्री. प्रमोद बापट, पुणे | ५००–०० |
| प्रा. वसंत मिरासदार, पुणे | १०१–०० |
| मॅजेस्टिक बुक स्टॉल, पुणे | ५०१–०० |
| श्री. बाळासाहेब कारले, सुरेश एजन्सी, पुणे | ५०१–०० |
| डॉ. म. वि. गोखले, पुणे | १०१–०० |
| श्री. ह. अ. भावे, पुणे | १०१–०० |
| श्री. सु. वा. जोशी, उत्कर्ष प्रकाशन, पुणे | १०१–०० |
| श्री. राजा फडणीस, पुणे | १५१–०० |
| प्रा. म. ना. अदवंत, पुणे | ५१–०० |
| श्री. राजेन्द्र बनहट्टी, पुणे | ५०१–०० |
| डॉ. गं. ना. जोगळेकर, पुणे | १०१–०० |
| प्रा. ह. श्री. शेणोलीकर, पुणे | १००–०० |
| श्री. ज. वि. जोशी, देवरुख | १००–०० |
| डॉ. मु. श्री. कानडे, पुणे | १०१–०० |
| श्री. प्र. ल. गावडे, पुणे | १००–०० |
| श्री. प्रभाकर अत्रे, डोंबिवली | १००–०० |
| एकूण रु. | १०,८२९–०० |

## परिषदेचे काही नवीन सभासद

(नोव्हें. १९८७)

**पुणे विभाग :-** श्री. यशवंत द. जोशी, सौ. रत्ना य. जोशी, सौ. माधवी महाजन (निगडी) श्री. चंद्रशेखर गानू, श्री. बबन ल. पोतदार, श्री. व्यंकटेश प्र. काळे, श्री. बाळकृष्ण ग. कुलकर्णी, श्री. द. श्री. बापट, सौ. स्वाती शिरीष साठे, श्री. विनायक कोलगेकर, सौ. माधुरी किरण येवलेकर, श्री. चंद्रकांत पं. कुलकर्णी, डॉ. सौ. शैला काळकर, सौ. मधुरा यशवंत रानडे, डॉ. सौ माधवी दिलीप वैद्य, सौ. शुभदा अभय वर्तक, श्री. रघुनाथ द. अग्निहोत्री, सौ. मंदाकिनी जोगळेकर, सौ. सुहासिनी अशोक देशपांडे, श्री. नारायण रामचंद्र खराडे, श्री. श्रीराम वामन कुलकर्णी, श्री. चंद्रशेखर पंडित, श्रीमती विमला जैन, सौ. जयश्री श्रीधर बापट, श्री. यशवंत लक्ष्मण फडके, मीना निखिल नाडकर्णी, श्री. राम श्रीधर पटवर्धन, श्री. अरुण अनंत नेरलेकर. सौ. अंजली शरद भावे, कु. विद्या भालचंद्र काटकर (चिंचवड) प्रा. बाळकृष्ण पांडुरंग पुराणिक, श्री. संजय बाळकृष्ण बाघमारे.

(पुढे चालू)

**पुण्या बाहेरील :**

**सांगली विभाग** : प्रा. चंद्रकांत कदम (खानापूर)

**कोल्हापूर विभाग** : श्री. शशिकांत रा. महाडेश्वर (कोल्हापूर) श्री. वि. दा. वासमकर (टाकळी–शिरोळ)

**अहमदनगर** : प्रा. सीताराम नारायण गोसावी (कोपरगाव) श्री. विजय बाळासाहेब नांगरे (चांदा, नेवासे)

**नाशिक विभाग** : श्री. प्रकाश होळकर, (लासलगांव), डॉ. शकुंतला परांजपे, (लासलगाव) श्री. के. ज. बूब, (लासलगाव,) श्री. नंदकुमार बाबुराव पाटील (लासलगाव) श्री. संजय दत्तात्रय पाटील (लासलगाव) श्री. नीतीनकुमार जव्हेरीलाल जैन (लासलगाव)

**धुळे विभाग** : प्रा. कैलास सावेंकर (नवापूर धुळे), प्रा. श्रीमती ललिता कृष्णा गांधी (नंदुरबार), श्री. सुभाष कृष्णराव शिकारे (धुळे), श्री. विश्वासराव फुलचंद मराठे (धुळे), श्री. कचरदास उदेचंद नाबरिया (धुळे)

**जळगाव विभाग** : प्रा. सौ. लिलावती मधुसुदन दंडवते (एरंडोल, जळगाव)

**ठाणे विभाग** : सौ. अंजली द. लिमये, श्री. रामदास ह. शिंदे, श्री. सुबोध देशपांडे, श्री. श्रीकृष्ण पारनाईक; सौ. मंगला सिन्नरकर, सौ. उषा दि. आठवले; श्री. वामन घनःश्याम देसाई, श्री. एम. आर. देशपांडे (डोंबिवली)

**बेळगाव** : श्री. राजाराम नारायण कुलकर्णी (निपाणी), प्रा. रूस्तुम अचलखांब (औरंगाबाद), श्री. नाथ नेरळकर (औरंगाबाद)

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद : साहित्यिक साहाय्य निधी

**दि. ३१ मार्च १९८८ पर्यंत परिषदेकडे साहित्यिक साहाय्य निधीसाठी आलेल्या देणग्यांचा तपशील.**

| देणगीदाराचे नांव | रक्कम रुपये |
|---|---|
| मागील जमा | ६९६५२–०० |
| श्री. महापौर ठाणे महानगरपालिका, ठाणे | ११,०००–०० |
| सौ. शकुंतला डावखरे, ठाणे | १०,०००–०० |
| श्री. विमला जैन, पुणे | ११११–०० |
| महाराष्ट्र साहित्य परिषद, धुळे शाखा | ३०००–०० |
| दक्षिण रत्नागिरी साहित्यसंघ, सावंतवाडी | ३०००–०० |
| श्री. भाई धारिया, निपाणी | १००१–०० |
| श्री. के. ग. आपटे, पुणे यांजकडून कै गणेश श्रीधर आपटे–स्मरणार्थ | ५०१–०० |
| श्री. व्यवस्थापक, सन् पब्लिकेशन्स, पुणे | ५००–०० |
| श्री. मनोहर पारसनीस, सौ. कुंदा पारसनीस, पुणे | २५०–०० |
| प्रा. रा. भि. जोशी, मुंबई | २०९–०० |
| श्री. राजाभाऊ फडणीस, पुणे | १०१–०० |
| सौ. विजया शेवडे, अहमदाबाद | १०१–०० |
| श्री. अशोक दा. रानडे, मुंबई | १०१–०० |
| डॉ. वसंत सावंत, सावंतवाडी | १०१–०० |
| श्री. हरिहर आठलेकर, सावंतवाडी | १०१–०० |
| श्री. विद्याधर भागवत, सावंतवाडी | १०१–०० |
| श्री. गजानन क्षीरसागर, पुणे | १०१–०० |
| प्रा. सु. का. जोशी, जळगाव | १०१–०० |
| श्री. नीलकंठ उद्धव कुलकर्णी, जळगाव | १०१–०० |
| श्री. पद्माकर विष्णु जोशी, पुणे | १०१–०० |
| श्री. वि. त्र्यं. शेटे, पुणे | १०१–०० |
| सौ. उमा शंकर कुलकर्णी, कोल्हापूर (शाखेमार्फत) | १००–०० |
| श्री. राम जनार्दन शेळके, पुणे | १००–०० |
| डॉ. व. दि. कुलकर्णी, पुणे | १००–०० |
| अनामिक, मुंबई | ५१–०० |
| श्री. श्रीराम फडके, कोपरगाव | ५१–०० |
| श्री. रा. व्यं. छत्रपती, सोलापूर | २५–०० |
| प्रा. सीताराम गोसावी, कोपरगाव | ११–०० |
| एकूण | १.०१७७३–०० |

(**दुरुस्ती** : पत्रिका अंक २४३ (ऑक्टोबर ते डिसेंबर १९८७,) पृ. ९२ वर सा. सा. निधी देणगीदारांच्या यादीत श्री. श्री. शं. नवरे असे नाव छापले आहे. त्याऐवजी **श्री. शं. ना. नवरे,** डोंबिवली हे नाव पाहिजे.)

# परिषद-वार्ता

## (१६ ऑक्टोबर १९८७ ते ३१ मार्च १९८८)

**स्मृतिदिन :**

**कै. व. ह. गोळे स्मृतिदिन :** कै. व. ह. गोळे यांच्या स्मृतिदिनानिमित्त दि. २९ व ३० आक्टोबर १९८७ रोजी अनुक्रमे 'नाट्यप्रयोग : आता आणि इथे' व 'नाट्यानुभव : अमूर्त आणि दूरवरचा' या विषयांवर प्रा. पुष्पा भावे यांची दोन भाषणे झाली.

**कै. माधव ज्युलियन स्मृतिदिन :** दि. २९-११-८७ रोजी कै. माधव ज्युलियन यांच्या स्मृतिदिनानिमित्त, श्री. गोपीनाथ तळवलकर यांच्या अध्यक्षतेखाली एक कविसंमेलन आयोजित करण्यात आले होते. यात सर्वश्री राजा दीक्षित, रमण रणदिवे, दीपक करंदीकर, राजेन्द्र शहा, प्रदीप निफाडकर, म. भा. चव्हाण, इलाही इनामदार आणि अरुणा ढेरे आदि कवींनी भाग घेतला. याच प्रसंगी श्री. गोपीनाथ तळवलकर यांच्या वयाला ७५ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल परिषदेमार्फत त्यांचा सत्कार करण्यात आला. कविसंमेलनाचे सूत्रसंचालन प्रा. राजा दीक्षित यांनी केले.

**कै. श्री. म. माटे स्मृतिदिन :** कै. श्री. म. तथा बापूसाहेब माटे यांच्या स्मृतिदिनानिमित्त दि. २५ व २६ डिसेंबर १९८७ रोजी 'आदिवासींचे जिणे' या विषयावर डॉ. गोविंद गारे यांची दोन व्याख्याने झाली.

**कै. वि. द. घाटे स्मृतिदिन :** या स्मृतिदिनानिमित्त, डॉ. भालचंद्र फडके यांचे 'लेखकाचे स्वातंत्र्य' या विषयावर दिनांक १८-१-८८ रोजी व्याख्यान झाले.

**कै. नरहर कुरुंदकर स्मृतिदिन :** या स्मृतिदिनानिमित्त दि. १५-२-८८ रोजी डॉ. प्र. ल. गावडे यांचे 'शिक्षकांची आत्मचरित्रे : एक समीक्षा' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**कै. ना. गो. चापेकर स्मृतिदिन :** या स्मृतिदिनानिमित्त डॉ. चंद्रशेखर बर्वे यांचे 'आपापले गांव-मराठी साहित्यिकांनी रंगविलेले' या विषयावर दिनांक ५-३-८८ रोजी व्याख्यान झाले.

**कै. बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिन :** या स्मृतिदिनानिमित्त दि. २१ मार्च १९८८ रोजी डॉ. अरुणा ढेरे यांचे 'काही आदिबंध : काही कविता' या विषयावर व्याख्यान झाले.

**पारितोषिक वितरण समारंभ :**

**कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत 'चि. वि. जोशी पारितोषिक' :** १९८७ चे 'चि. वि. जोशी पारितोषिक' 'विसाजी पंताची बौस कलमी बखर' या पुस्तकाबद्दल पुस्तकाचे लेखक श्री. वसंत बापट यांना (रु. १२००) आणि प्रकाशक श्री वैभव भंडारी (चिरायु प्रकाशन, पुणे) यांना (रु. ९००) देण्यात आले. प्रसिद्ध विनोदी साहित्यिक प्रा. द. मा. मिरासदार यांच्या अध्यक्षतेखाली दि. १९ जानेवारी १९८८ या चि. वि. जोशी यांच्या जन्मदिनी पारितोषिक वितरण समारंभ झाला. या प्रसंगी परीक्षकांच्यावतीने डॉ. गं. ना. जोगळेकर यांचे भाषण झाले. उत्तरादाखल प्रा. वसंत बापट यांनी भाषण केले.

**कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत 'कवी कुसुमाग्रज पारितोषिक' :** १९८७ चे कवी कुसुमाग्रज पारितोषिक 'गोधडं' या कवितासंग्रहाबद्दल कवी श्री. वाहरु सोनावणे यांना (रु. १२००) आणि कविता संग्रहाचे प्रकाशक श्री. रवीन्द्र बेहेरे (रविराज प्रकाशन, पुणे) यांना (रु. ९००) समारंभपूर्वक देण्यात आले. पारितोषिक वितरण समारंभ सुप्रसिद्ध कवयित्री डॉ. अनुराधा पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली दि २७-२-१९८८ या कवी कुसुमाग्रज यांच्या जन्मदिनी साजरा झाला. या प्रसंगी परीक्षकांतर्फे डॉ. अरविंद कुलकर्णी यांचे आणि पारितोषिक विजेते कवी श्री. वाहरु सोनावणे यांचे उत्तरादाखल भाषण झाले.

**कविवर्य यशवंत पारितोषिक :** कविवर्य यशवंत यांच्या स्मरणार्थ त्यांच्या कुटुंबियांनी दिलेल्या देणगीच्या व्याजातून दरवर्षी उत्कृष्ट कवितासंग्रहास साहित्य परिषदेतर्फे रु. ५०१ चे पारितोषिक देण्यात येणार आहे. १९८७





अनुक्रमणिका

चे हे पहिले पारितोषिक डॉ. अरुणा ढेरे यांच्या 'यक्षरात्र' या कविता संग्रहास परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते दिनांक ९ मार्च १९८८ रोजी समारंभपूर्वक देण्यात आले. यावेळी परीक्षकांतर्फे डॉ. ललिता कुंभोजकर यांचे 'यक्षरात्र' या कवितासंग्रहाची ओळख करून देणारे भाषण झाले. डॉ. अरुणा ढेरे यांनी उत्तरादाखल आपले मनोगत व्यक्त करून आपल्या काही कविता म्हणून दाखविल्या. श्री. शंकर पाटील यांचे समयोचित भाषण झाले.

**सत्कार समारंभ :**

**डॉ. भैरप्पा यांचा सत्कार :** ९ डिसेंबर १९८७ रोजी सुप्रसिद्ध कन्नड कादंबरीकार डॉ. एस. एल. भैरप्पा यांचा जाहीर सत्कार परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते करण्यात आला. या प्रसंगी डॉ. अ. रा. तोरो आणि श्री. शांता शेळके यांची डॉ. भैरप्पा यांच्या साहित्याची ओळख करून देणारी भाषणे झाली. शेवटी डॉ. भैरप्पा यांनी सत्कारास भावपूर्ण शब्दात उत्तर दिले.

**डॉ. रा. चिं. ढेरे यांचा सत्कार :** यंदाच्या वर्षी डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या 'श्री. विठ्ठल : एक महासमन्वय' या ग्रंथास साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळला. त्या निमित्त परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते दि. ४-२-८८ रोजी डॉ. रा. चिं. ढेरे यांचा श्रीफल व शाल देऊन सत्कार करण्यात आला. याप्रसंगी श्री. ढेरे यांच्या गौरवार्थ प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. प्र. न. जोशी, डॉ. ॲन फेल्डहाऊस आणि डॉ. गं. ना. जोगळेकर यांची भाषणे झाली. शेवटी श्री. रा. चिं. ढेरे यांनी सत्कारास उत्तर दिले.

**भेटी-गाठी :** ६१ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष व ठाण्याचे महापौर श्री. वसंत डावखरे यांनी ६-१-८८ रोजी परिषदेस भेट देऊन परिषदेच्या कामाबद्दल समाधान व्यक्त केले. श्री. डावखरे यांनी परिषदेने सुरू केलेल्या साहित्यिक साहाय्य निधीसाठी ठाण्याच्या महानगरपालिकेमार्फत रु. ११००० व व्यक्तिशः सौ. शकुंतला डावखरे यांच्या नावाने रु. १०००० अशी एकूण रु. २१००० ची देणगी दिलेली आहे. त्याबद्दल परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांनी पुष्पगुच्छ देऊन श्री. डावखरे यांचा सत्कार केला.

**श्रद्धांजलि :** सुप्रसिद्ध कथालेखक **श्री. जी. ए. कुलकर्णी** यांचे दि. ११-१२-८७ रोजी दुःखद निधन झाले. त्यानिमित्त दि. २१-१२-१९८७ रोजी परिषदेत शोकसभा आयोजित करण्यात आली होती. श्री. शंकर पाटील सभेच्या अध्यक्षस्थानी होते. याप्रसंगी शांता शेळके, डॉ. चन्द्रशेखर वर्वे, डॉ. अरुणा ढेरे यांची भाषणे झाली. श्री. चन्द्रकान्त परचुरे यांनी श्री. जी. ए. कुलकर्णी यांच्या व्यक्तिगत आठवणी सांगितल्या. शेवटी दुखवटयाचा ठराव संमत करण्यात आला.

**कार्यकारिणी वृत्त :**

(१) परिषदेचे कार्यवाह डॉ. म. वि. गोखले यांना परदेशास जावयाचे असल्याने त्यांनी आपल्या कार्यवाह-पदाचा राजीनामा दिला. त्यांच्या जागी श्री. ज्योत्स्ना देवधर यांची कार्यवाह म्हणून उरलेल्या मुदतीसाठी एकमताने निवड करण्यात आली.

(२) दि. ६ व ७ फेब्रुवारी १९८८ रोजी सावंतवाडी येथे कार्यकारिणीची सभा घेण्यात आली. यावेळी दक्षिण रत्नागिरी साहित्य संघाने आयोजित केलेल्या लेखक मेळाव्यात परिसंवाद, कविसंमेलन, मुलाखत इ. कार्यक्रम झाले (त्या सर्व कार्यक्रमांचे वृत्त इतरत्र दिले आहे.). यावेळी साहित्यिक सहाय्य निधीसाठी श्री. शंकर पाटील यांच्या कथाकथनाचा बहारदार कार्यक्रम झाला. या कार्यक्रमासाठी डॉ. वसंत सावंत व त्यांचे सहकारी यांनी विशेष परिश्रम घेतले.

(३) दि. २७-१-१९८८ रोजी धुळे येथे श्री. शंकर पाटील यांच्या कथाकथनाचा कार्यक्रम 'साहित्यिक साहाय्य निधी' साठी आयोजित करण्यात आला. म. सा. प. धुळे शाखेचे कार्याध्यक्ष श्री. कुसुमाकर शिंपी आणि त्यांचे सहकारी यांनी हा कार्यक्रम आयोजित केला होता.

**शाखावृत्त :** धुळे : दिनांक १६-२-८८ रोजी कै. पिलाजीराव फडणीस स्मृतिदिनानिमित्त एक कवि संमेलन माध्यमिक विद्यालय देवपूर, धुळे येथे आयोजित करण्यात आले होते. स्थानिक कवींनी मोठ्या उत्साहाने यांत भाग घेतला.

**राजा फडणीस / ज्योत्स्ना देवधर / प्रभाकर अत्रे** ☐










महाराष्ट्र साहित्य परिषद

# पदाधिकारी व कार्यकारी मंडळ त्रैवार्षिक निवडणूक

घटना नियम १२ [अ ते ऊ] व १३ [अ ते इ]

**( दिनांक १ जुलै १९८८ ते ३० जून १९९१ अखेर )**

## सूचना

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेनुसार परिषदेचे पदाधिकारी आणि कार्यकारी मंडळ यांच्या त्रैवार्षिक निवडणुकीचा संपूर्ण कार्यक्रम पुढे दिला आहे. निवडणुकीच्या निकालासाठी निर्वाचन मंडळाने रविवार दि. १९ जून १९८८ हा दिनांक मुक्रर केला आहे.

परिषदेचे कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष आणि कार्यकारी मंडळाचे अकरा सभासद या जागांसाठी परिषदेच्या मतदार सभासदांनी भरून पाठवावयाचे छापील आवेदनपत्र सोबत दिले आहे. ही आवेदनपत्रे परिषदेच्या कार्यालयातसुद्धा सभासदांना उपलब्ध केली जातील. या आवेदन पत्रात (नॉमिनेशन फॉर्म) उमेदवारांची नावे सुचवायची आहेत.

ही आवेदनपत्रे सूचक व अनुमोदक यांच्या स्वाक्षऱ्यांसह आणि सूचित उमेदवाराच्या संमतिदर्शक स्वाक्षरीसह सोमवार दि. १६ मे १९८८ रोजी सायंकाळी ६-३० वाजेपर्यंत पोचतील अशा पद्धतीने **' निमंत्रक, निर्वाचन मंडळ, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ४११ ०३० '** या पत्त्यावर पाठवावी. ठरलेल्या वरील मुदतीत आवेदनपत्रे कार्यालयात पोचण्याची जबाबदारी सर्वस्वी सभासदांची राहील. कळावे, ही विनंती.

आपले

**मो. रा. वाळंबे (निमंत्रक)**
**व. कृ. नूलकर**
**गो. कृ. पटवर्धन**
निर्वाचन मंडळ

( मागे पहा )



## निवडणुकीबाबतच्या सूचना

१) कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष हे दोन पदाधिकारी आणि कार्यकारी मंडळाचे ११ सभासद, याप्रमाणे एकूण तेरा (१३) जागांची निवड व्हावयाची आहे.

२) मतदार यादीतील कोणीही सभासद या तेरा जागांपैकी एक किंवा अधिक जागांसाठी नावे सुचवू शकतो.

३) कार्याध्यक्ष व कोषाध्यक्ष या जागांसाठी फक्त पुण्यातील सभासदांची नावे सुचविता येतील.

४) कार्यकारी मंडळाच्या गटवार जागांसाठी त्या त्या गटातील (सोबतच्या आवेदनपत्रात निर्देश केल्याप्रमाणे) उमेदवाराचे नाव सुचविता येईल.

५) सूचक, अनुमोदक व सूचित उमेदवार हे मतदार-सभासद असणे आवश्यक आहे.

६) कोणाही उमेदवारास कार्यकारी मंडळाच्या सभासदत्वासाठी किंवा पदाधिकाऱ्याच्या कोणत्या तरी एकाच जागेसाठी अर्ज भरता येईल.(घ-नि-१३-इ)

७) कोणाही मतदारास स्वतःचे नाव सुचविता येणार नाही किंवा स्वतःच्या नावास अनुमोदन देता येणार नाही.

८) सूचितांच्या नावांची आवेदनपत्रे भरून कार्यालयाकडे सोमवार दि. १६ मे १९८८ सायंकाळी ६॥ वाजेपर्यंत पोचणे आवश्यक आहे.

९) सूचित उमेदवारास सोमवार दि. २३ मे १९८८ सायंकाळी ६॥ वाजेपर्यंत स्वतःच्या स्वाक्षरीचे पत्र लिहून नाव परत घेता येईल.

## त्रैवार्षिक निवडणुका ( १९८८ ते १९९१ ): कार्यक्रम

१) परिषदेने प्रस्तुत निवडणुकीकरिता मतदार सभासदांची जी यादी निर्वाचन मंडळाच्या स्वाधीन केली आहे, ती पुणे येथील कार्यालयात कार्यालयीन वेळेत अवलोकनासाठी उपलब्ध करून दिली जाईल. त्याचप्रमाणे- मुंबई म. सा. संघ (गिरगाव), विदर्भ सा. संघ (नागपूर), मराठवाडा साहित्य परिषद (औरंगाबाद), परिषदेच्या वाई,सांगली,कोल्हापूर, इचलकरंजी, सोलापूर, अहमदनगर, श्रीरामपूर, कोपरगाव, नाशिक, येवला, धुळे, साक्री, जळगाव, ठाणे, डोंबिवली, खोपोली, लासलगाव, जत, येथील शाखा या ठिकाणीही यादी पाहावयास मिळेल.

### निवडणुकीचा कार्यक्रम

२) **शनिवार दि. ३० एप्रिल १९८८**
निवडणूक सूचना व निवडणूक कार्यक्रमपत्रिका प्रसिद्ध करण्याची अंतिम तारीख.

३) **सोमवार दि. १६ मे १९८८**
सूचितांच्या नावांचे आवेदनपत्र मुख्य कार्यालयात सायंकाळी ६॥ वाजेपर्यंत पोचले पाहिजे.

४) **मंगळवार दि. १७ मे १९८८**
सूचितांच्या नावांच्या आवेदनपत्रांची छाननी सायंकाळी ६ वाजता.

५) **सोमवार दि. २३ मे १९८८**
सायंकाळी ६॥ वाजेपर्यंत सूचित उमेदवाराने नाव मागे घेण्याची मुदत.

६) **सोमवार दि. ३० मे १९८८**
मतदार सभासदांकडे मतपत्रिका रवाना करण्याची मुदत.

७) **शनिवार दि. १८ जून १९८८**
सायंकाळी ६॥ वाजेपर्यंत मतपत्रिका कार्यालयाकडे येण्याची मुदत.

८) **रविवार दि. १९ जून १९८८**
सकाळी ९ वाजता म. सा. परिषदेच्या कार्यालयात मतमोजणी सुरू होईल व त्यानंतर निकाल जाहीर होईल.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

## पदाधिकारी व कार्यकारी मंडळ निवडणूक

(जुलै १९८८ ते जून १९९१ अखेर)

### आवेदनपत्र (नॉमिनेशन फॉर्म)

१. सूचित व्यक्तीचे संपूर्ण नाव : ______________________
(आडनावाने सुरुवात)

पत्ता : ______________________

______________________

मतदार यादीतील क्रमांक :

२. कोणत्या पदासाठी नाव सूचित केले आहे त्याचा तपशील* (तळटीप पाहा) ______________

पद : ______________ कार्यकारी मंडळ सभासद गट : ______________

३. सूचकाचे संपूर्ण नाव : ______________________

पत्ता : ______________________

मतदार यादीतील क्रमांक :

दिनांक : — — १९८८ सूचकाची स्वाक्षरी

४. अनुमोदकाचे संपूर्ण नाव : ______________________

पत्ता : ______________________

______________________

मतदार यादीतील क्रमांक :

दिनांक — — १९८८ अनुमोदकाची स्वाक्षरी

वरील सूचनेस माझी संमती आहे.

दिनांक : — — १९८८ सूचित व्यक्तीची स्वाक्षरी

टीप :– अधिक आवेदनपत्रे लागल्यास मुख्य कार्यालयाकडून किंवा इतर केंद्रांकडून मागवून घ्यावीत.

* या जागी पुढीलपैकी अभिप्रेत जागेचा निर्देश करावा :–

(अ) पदाधिकारी : कार्याध्यक्ष (एक जागा), कोषाध्यक्ष (एक जागा).
(कार्याध्यक्ष व कोषाध्यक्ष या जागांसाठी फक्त पुण्यातील सभासदांची नावे सुचविता येतील.)

(आ) कार्यकारी मंडळ– गटवार जागा :

अ– पुणे : जागा ५

आ– सातारा व सांगली १, कोल्हापूर व सोलापूर १, अहमदनगर व नासिक १, धुळे व जळगाव १,





**दक्षिण रत्नागिरी साहित्य संघ, सावंतवाडी आणि महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे**

यांच्या सहकार्याने दि. ६ व ७ फेब्रुवारी १९८८ रोजी सावंतवाडी येथे झालेला लेखक मेळावा.

(सविस्तर वृत्त या अंकात पृष्ठ ३८ वर)




मेळाव्यात भाषण करताना डॉ. वसंत सावंत

बसलेले डावीकडून : श्री. राजा फडणीस, श्री. शंकर पाटील, श्री. राजेन्द्र बनहट्टी, डॉ. वसंत स. जोशी




मेळाव्यात भाषण करताना डॉ. गं. ना. जोगळेकर

बसलेले डावीकडून : डॉ. वसंत सावंत, श्री. शंकर पाटील, श्री. राजेन्द्र बनहट्टी